मायबोली मराठीचे झुंजार शिलेदार
सर्वश्री काका गाडगीळ
यांस

—गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

# परिचय

बदलत्या परिस्थितीच्या पुराबरोबर वाहात जावयाचें नाकारणाऱ्या एका झुंजार माणसाची ही कथा.

ह्या भाग्यवान् देशांत असे अनेक धोंडी इतस्तत: विखुरले आहेत. हें त्यांचें कौतुक त्यांनीं वेळांत वेळ काढून वाचावें, ही इच्छा. किंबहुना ही कथा त्यांच्यासाठींच लिहिली आहे.

तळेगांव दाभाडे ( जि. पुणें )
रामनवमी, १८७७

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

# पवनाकांठचा धोंडी

पवन मावळांत जमीन थोडकी. डोंगरच फार. त्या डोंगरांतून वाट शोधीत पवना धांवल्ये. वांकडी तिकडी. जागा मिळेल तशी. बहुतेक सगळा पवनाकांठ झाडीनं मोहरून निघाला आहे.

सह्याद्रींत किती तरी वनस्पती. त्यांच्या मुळ्या ओरपीत पावसाळ्यांतलं पाणी वाहतं तें पवनेला येऊन मिळतं. त्यामुळं पवनेकांठची शेतीहि कसदार. पवनेकांठचा तांदूळ तर तापानं पछाडलेल्या माणसाला खाऊं घालावाच; पण नागली अन् जोंधळाहि आजाऱ्याला बाधायचा नाहीं.

त्या डोंगरांच्या दाटींत एका शिखरावर तुंगीगड उभा आहे. त्याचं नांवच तुंग. तुंग म्हणजे उंच. सुरूच्या शेंड्यासारखा तुंगीचा बालेकिल्ला आकाशांत उभारला आहे. चढायला भलता कठीण. त्यांत कड्यावरल्या महादेवाचं देऊळ म्हणजे तर बोलूं नका. महादेवाला तांब्याभर पाणी घालून परतायचं म्हणजे प्राणांशीं गांठ. भले भले त्या शर्यतींत हार खाऊन परतले.

पण धोंडी हवालदाराच्या तो हातचा मळ आहे. धोंडीबा शाण्णव कुळींतला मराठा. आडनांव ढमाले. पण तें कुणाला फारसं माहीत नाहीं. असायचं कारणहि नाहीं. सगळा पवनपट्टा त्या घराण्याला हवालदार म्हणून ओळखतो.

हवालदार म्हणजे पोलिसांतला नव्हे. तुंगीगडाचा. शिवाजीच्या काळीं एका लढाईत किल्लेदार पळून गेला. हवालदार मात्र शर्थीनं झुंजला. तेव्हांपासून राजानं तुंगीगड ढमाले घराण्याच्या स्वाधीन केला. पाच्छाई आली अन् गेली. पेशवाईहि उगवली अन् मावळली. पण तुंगीगड ढमाले घराण्याकडेच राहिला.

इंग्रजांचं राज्य आलं. किल्ल्यांचं मोल हारपलं. भले भले शर्थीचे किल्ले ओसाड झाले. तट ढासळले. बुरूज कोसळले. वरल्या इमारतींची धूळ झाली.

## पवनाकांठचा धोंडी

जिथं पायींच्चीं पैंजणं वाजवीत किल्लेदारणी अन् पोतनीशिणी पाण्याचे हांडे डोईवर घेऊन चालायच्या, त्या तळ्यांच्या कांठीं करवंदीच्या जाळ्या उगवल्या. सायाळी कांटे पिस्कारून धांवूं लागल्या. कोल्हीं उदासवाणी कोल्हेकुई गाजवायला लागलीं.

तुंगीचंहि तेंच झालं. गडावरली वस्ती खालीं पेठेवर राहायला आ. त्याला दीडशें वर्षे झालीं. नाना धंद्यांतले लोक. बारगीर, शिकलगार, चांभार, येसकर, मोतदार, तोपची, न्हावी, बामण,–किती तरी. नुसतीं नांवं राहिलीं. बहुधा सगळ्यांनीं धंदे टाकले. शेतकी हातीं घेतली.

पवनाकांठचा एक दहा एकरांचा सलंग तुकडा हवालदाराकडे होता. नेमकी तिथंच एकदां मोठी जबर झुंज झाली होती. लढतां लढतां तेव्हांचा हवालदार तिथं हारपला. पुढं तें शेत हवालदार घराण्याला इनाम मिळालं. जिथं तो पूर्वज पडला, तिथंच एक दगडी वीर उभा आहे. हवालदारांच्या घरीं कांहीं अधिक आगळं असलं कीं अगोदर त्या वीराला निवदबोण व्हायचं.

* * *

आज पोळ्याचा निवद घेऊन धोंडी हवालदार वीराकडेच निघाला होता. हातीं अंगावरच्या उपरण्याच्या टोंकानं झांकलेलं वाढपाचं ताट होतं. नजर हिरव्या भाताच्या कच्चकचीत लोंब्यांवरून फिरत होती.

त्या नजरेंत अभिमान होता. खराखुरा अभिमान. हवालदाराच्या चोंढ्यांतल्या लोंबटासारखं लोंबट दिसायला दुर्मिळ. पुण्या – मुंबईकडलीं माणसं कधींमधीं तुंगीगडावर सहली घेऊन यायचीं. त्यांना धोंडी आपली शेती दाखवायचा. त्यांतले जाणकार म्हणायचे,

"वा ! प्रदर्शनांत ठेवलं पाहिजे हें पीक !"

त्या बिचाऱ्यांना काय माहीत ? हें असलं पीक नुसत्या प्रदर्शनांत ठेवण्याच्या हांवेनं निघत नसतं. त्याला काळ्या आईवर भक्ति लागते. श्रद्धा लागते.

धोंडी हवालदाराजवळ दोन्ही होतीं. भक्तीहि होती. कष्ट करायची वृत्तीहि होती. त्याचं त्याच्या जमिनीवर आईसारखं प्रेम होतं. दुसरी उपमाच सांपडायची नाहीं. कुणीं विचारलं तर तो म्हणायचा,

"आर, मातामाउली हाय ती ! एकल्या माजीच नव्ह ! वाडवडलांची. ा अंगच्या असुदानं भिजविलिया ती. आमच्यानं कुठं होतंय् ायचं झालं ! पर ती आई हाय. सरधा ठिवली तर तीबी ती पीक व्येशील म्हनून !"

ा कष्ट ? धोंडी हवालदारासारखा खप्या मिळणं कठीण. अक्षरशः ायचा. ऊन्ह नाहीं, तहान नाहीं, थंडी नाहीं, पाऊस नाहीं. बाकीचे ंवकरी डोळसोबाच्या उरसाला गाड्या धरून जायचे. धोंडी शेतांत कांहीं- हीं करतांना दिसायचा. ते हांकारायचे,

" हवालदार, पुरं झालं ! चला उरसाला. जागा हाय गाडींत, या ! "

शेरणीनं कुपाटींत काटी ढोशीत हवालदार म्हणायचा,

" छा ! आमचं कसलं येनं होतंयू ? कुपाट पुरी व्हायची अजून."

" अहो या तुमच्या पिकाला कोन हात लावतंय् ? हवालदाराचं पीक राखावं हये समद्यांना उमगतय् "

" झालं ुचं म्हननं ! पर मी हवालदार–हये डुकरांना कुठं ठावं हाय ? तीं करतील ना पिकाचा नासाडा ! "

मग सबंद गाडी हंशानं गदागदा हालायची. धोंडी म्हणायचा,

" व्हा तुमी म्होरं. माज्या नादीं लागूं नका ! "

नांगर धरावा तर धोंडी हवालदारासारखा. तास कसं सूत लावल्यागत. कणभर अलीकडे का पलीकडे व्हायचं नाहीं. सुरुवातीला एकदां जें फाळ जमिनीच्या पोटांत शिरायचं, तें संध्याकाळींच बाहेर यायचं. असं वाटायचं, कीं नुसती मूठ अन् हळसच तेवढी फिरत्येय् बैलांमागं. मातीचं प्रत्येक ढेलपाड जमिनीच्या पोटांतून उमळून यायचं. हीं ढेलपाडं उन्हाच्या घामानं हड- कायला लागलीं कीं त्यांचा मऊसूद वास सुटायचा. तो वास घुमायला लागला कीं शेतकरी म्हणायचे,

" झाली वाटतं हवालदाराची नांगरनी. औंदा वाईच लवकर आटपली."

कुळवणं तसंच. पेरणं तसंच. कोळपणं तसंच. कापणी तशीच.

इतरांच्या बाजऱ्या कापल्या जायच्या – तर खालीं हात हात धसकांडं राहायचीं. पण हवालदाराच्या शेतांत गडी आले कीं त्यांचे हात भुईसरपट

चालायचे. कारण मागं धोंडी घारीसारखी नजर ठेवीत फिरायचा. गडी जरा चकरावतांना दिसला तर तो हांकारायचा,

" अहो रावसाब ! आपुन हिकडं कुनकड वाट चुकल्याय् जागा तिकड ! रंगम्हालांत ! थूः तुज्या जिन्यावर ! आर मर्दा खायाला भेट ना झालंय् र ! "

अन् मग त्या गड्याच्या हातून विळा हिसकावून हवालदार ज कापणीला भिडायचा. जसा कांहीं भुतानं झपाटलाय्. पातीमागून संपायची. हां हां म्हणतां पीक आडवं व्हायचं.

ही भक्ति आणि श्रम वायां गेले नाहींत. कधींच नाहींत. धोंडी ह दाराच्या खळ्यावर दाण्यांची अमाप रास उभी ठाकायची, आणि धोंडीच्या रक्तांतला हवालदार जागा व्हायचा.

तुंगीगड जगाच्या आठवणींतून जवळजवळ नाहींसा झाला होता. सर नकाशावरच काय तें त्याचं अस्तित्व.

तुंगीगडच जिथं हिशेबांत नाहीं तिथं त्यावरला हवालदार किस झा पत्ती ! फार कशाला ? अगदीं गडावरल्या कामगारांचीं पोरंसोरं पु मुंबईला कामासाठीं गेलीं, अन् गड त्यांच्याहि आठवणींतून पुसला गेल

पण हवालदाराचं जगच वेगळं. किल्ला पडला. तटाचे धोंडे को त्यांची माती व्हायला आली. गडावरले कामदार एकमेकांपासून दुरा एका धोंडी हवालदाराला मात्र कोणीहि त्याच्या जागेवरून हालवूं श नाहीं. तो खालीं उतरलाच नाहीं. त्याच स्वप्नांत रेंगाळत राहिला.

त्याला अजून वाटे, कीं आपण हवालदार आहोंत. आपल्या नसांतू श्रीमंत रक्त धांवतंय्. तेजस्वी रक्त. मानी रक्त. त्याचा पीळ कांहीं अ मोडला नाहीं.

जवळ कांहीं फारसं राहिलं नव्हतं. तरी अजून त्याला वाटे, क लोकांच्या कामीं यावं. आपलं धन, शरीर, सगळं कांहीं जसं आ शूर, मानी पूर्वजांचं आलं — तसंच. मग त्यापायीं आपल्याला दारिद्र्य तरी चिंता नाहीं. आपलं शरीर अजून या मातीच्या कामीं खर्चीं पडा

आणि याचा मोबदला ? मोबदला—तो एवढाच. लोकांनीं आपल हवालदार म्हणावं. आपला मान राखावा. आपल्या शब्दापुढं जाऊं नं

यासाठीं हवालदाराची सतत धडपड सुरू असायची.

खळं सुरू झालं कीं हवालदार बलुत्यांना आवर्जून बोलावून त्यांच्या पदरांत बलुतं टाकायचा. कांहीं बलुतेदार परागंदा झाले होते. ज्यांची वृत्ति मोडली असे कांहीं होते त्यांत. हुसन्या शिकलगार लोणावळ्याला बत्त्यांचं दुकान घालून राहिला होता. देवीसिंग तोपच्याची बाईल खेड्यापाड्याच्या बाजारांत चिमण्या, आरसे, खेळणीं, असलं कांहीं सटरफटर विकायची.

पण शेतांत दाण्यांची रास पडली, कीं धोंडी हवालदार पार लोणावळ्या-पर्यंत जाऊन शिकलगाराचं बलुतं पोंचतं करायचा. हुसन्या आतां मोठा माणूस झाला होता. पाठीवर गठुळं घेऊन धोंडी दारांत उभा राहिला कीं त्याच्या कपाळावर आठी दिसायची. पण त्याची म्हातारी लगबगीनं बसकर टाकून म्हणायची,

"आओ हवालदार ! ह्यांच बैठो."

"ह्यें तुमचं बलुतं आनलंय् ! हुसन्याची मा, हुसन्यानं कांहीं राखलं न्हाई जुन्यांतलं—"

"अजी अभी बच्चा हय —"

"तर ! पोरीला पोरं व्हायला लागलीं.–अजून बच्चाच हाय् ! पोरीचं लगीन करतांना काई येऊन इच्यारलं न्हाई आमाला. हवालदार काई मेला न्हवता ! जिताच हाय् म्हनावं !"

अन् मग हवालदाराची समजूत काढतां काढतां म्हातारीची पुरेवाट होई.

तसंच देवीसिंगाच्या बायलीचं. तिला निरोप मिळायचा,

"भाभी, तुला तुंगीच्या हवालदारानं बलिवलंय्."

"व्हय् र दादा ! बलुत्यापायींच असल् !"

एखादे दिवशीं तीहि येऊन बलुतं घेऊन जायची. डोळ्यांत पाणी आणून ती म्हणायची,

"हवालदारदादा, समद्यांनीं जुनं सोडलं,—पर तुमीं काई सोडल न्हाई अजून."

"सोडून कसं चालल् माज्या बाई ! वाडवडिलांची कावड हाय ही. काशीपासनं निगालीया; ती रामेसरालाच जायाची."

पवनाकांठचा धोंडी

ही हवालदारी धोंडीच्या नसानसांतून घुमायची. त्याला वाटायचं, सगळ्या खेड्याच्या बऱ्यावाइटाची जबाबदारी आपल्या डोईवर आहे—आपल्या एकट्याच्या.

आपण सगळ्यांची काळजी केली पाहिजे. निगराणी ठेवली पाहिजे. वाईट झेललं पाहिजे. चांगलं यांच्यासाठीं ठेवलं पाहिजे. हे सगळे आपल्या आसऱ्यानं राहिले आहेत. तेव्हां यांच्या अंगाला धक्का लागतां उपयोगाचा नाहीं.

नुसतीं माणसंच नव्हेत तर धोंडीला गुरांचाहि कळवळा. गुरांच्या पाठीवर कुणीं अधिक आगळी काठी टाकलेली धोंडीला खपायची नाहीं. तो लगेच कडकायचा,

" ए राक्षेसा ! अर लई माज आला असल तर डोंगरावर का धडका घीनास ? "

कधीं कधीं ही गुरांवरली माया स्वतः हवालदाराच्या अंगावर उतायची. एकदां आपल्या मारकुट्या गोऱ्ह्याला बांधतांना लका ढमाल्यानं काठी उचलली. हवालदाराला पाहतांच त्यानं ती खालीं तर टाकलीच, पण तो गागला,

" व्हय हवालदारदादा, आतां ह्यो गोऱ्हा कसा बांधायचा ? "

" मायेची येक थाप टाकली पाठीवर तर वाघबी सुतावानी सरळा होईल. मग ह्यो तर गोऱ्हाच हाय."

धोंडी पुढं झाला खरा; पण ती मायेची थाप अंगावर पडण्यापूर्वींच गोऱ्ह्यानं मोहरा फिरवून धोंडीला भिंतींत घोळसलं. सोडवतां सोडवतां पुरे वाट झाली. तरी धोंडीचं तें खरं !

* * *

हातीं निवदाचं ताट घेऊन धोंडी वीराजवळ पोंचला. ताटांत चार निवद मांडले होते. पुरणाची पोळी, भाताचं ढेकूळ, वरणाचा ठिपका, अन् एकेक भजं. वीरापुढं एक फाळका ठेवून धोंडी भक्तिभावानं म्हणाला,

" म्हातारबा, तुजं रगात या काळींत सांडलं ! तवा ही धरती अशी पिकतीया. माजी येकच विच्छा. माजंबी रगात या काळीच्या कुशींत सांडूं दे ! "

दुसरा फाळका धोंडीनं शेताच्या बांधावर ठेवला, आणि दंडवत घालून नाक घाशीत बोलला,

" आई, तुर्जी लेकरं आमी. माज्या मनांतली विच्छा तुला ठावी हाय. ती कवा तरी पुरी कर."

जमिनीवर हात घासून तो धोंडीनं आपल्या भाळावर फांसला. तेवढ्यांत त्याचे चारी बैल धांवतच नदीच्या मेरेनं शेतांत शिरले. त्यांच्या पाठोपाठ गोऱ्ह्याच्या पाठींत कोपराचा कणका घालीत कोंडी आंत आला.

कोंडी धोंडीपेक्षां वीस वर्षांनीं लहान. धोंडीच्या मागचीं सगळीं लेंकरं गेलीं, अन् नवसासायासानं कोंडी राहिला. तो एक वर्षाचा असतांना धोंडीची आई गमावली. धोंडीची मावळण माघारीं आली होती. तिनं त्याला सांभाळला.

बाप मरतांना सांगून गेला,

" धोंडीबा, माज्या न्हानग्याला सांबाळ."

पण हें धोंडीला सांगावंच लागलं नाहीं. प्रेम करणं जणूं तो आईच्या पोटांतूनच शिकून आला होता. त्यानं कोंडीला उचलून छातीशीं धरलं.

अन् कोंडी आज जो अंगापिंडानं पिकल्या लिंबासारखा गरगरीत भरलाय् , – ती सगळी धोंडीच्या घरधनिणीची माया. धोंडीच्या माजघरांत एकदांच पाळणा हालला. तीन महिन्यांनीं धोंडी डोळे पुशीत त्या लेंकराला काळ्या आईच्या कुशींत झोंपवून आला. ती सारजेच्या बाळंतपणाची पहिली अन् शेवटली खेप.

तेव्हां तिनं सगळी माया धाकल्या दिरावर लावली. ती अबोल बाई दिराचं सगळं जातीनं करायची. कोंडी एवढा लाडावला तो या कौतुकामुळंच.

भलत्या वेळीं भलते छंद घेतले नाहींत – मग तो कोंडी कसला ? पांच-सहा वर्षांचा होता, – तेव्हां त्यानं एक गंमतच केली.

गोइंदा माळ्याची बाईल जरा थट्टेखोर होती. हवालदाराच्या शेतांत भात काढायला आली. अंगावर पितं पोर होतं. बांधावर आइनाच्या सांवलीला त्याला पाजीत बसली. कोंडी हुंदडत तिच्याजवळ आला. त्याला ती म्हणाली,

" कोंडीनाना, तुजा जनम फुकट ! "

तरारून कोंडी म्हणाला,

" कां ? मपल्या व्हयनीला सांगू का ? "

" का सांगीनास जाऊन ? तीबी ह्येच सांगल."

" काय सांगल ? "

" भाग्याचं लेकरू असतं, त्याला असलं आंगावरलं दूद प्याया भेटतं ! "

" मंग ? मीबी पितों दूद ! "

" कुनाचं ? "

" मपल्या बकरीचं ! "

गदागदा हसून माळीण म्हणाली,

" बकरीचं दूद कोन पितं, ठावं हाय का ? "

" कोन ? "

" बोकड ! "

" हाट् ! मी मारीन तुला ! "

" सावकास का मारीनास ! पन आदुगर तुज्या व्हयनीला जाऊन इच्यार!"

काय उत्तर द्यावं तें कोंडीला सुचेना. मग तो चिडून ओरडला,

" मीबी आंगावरलं दूद पीन ! "

" कुनाच्या ? "

" मपल्या व्हयनीच्या ! "

आणि मग कोंड्यानं सारजेला तेवढ्या सगळ्या गडीमाणसांत लाजेनं मेल्याहून मेल्यासारखं केलं. शेवटीं संध्याकाळीं घरीं गेल्यावर ती स्वयंपाक-घरांत त्याला अंगाशीं घेऊन बसली, तेव्हां त्याचं आरडणं आणि तिला मारणं थांबलं. धोंडीलाहि चिरड आली. तो म्हणाला,

" आइकलं का ? तुमाला ह्ये जड जाईल म्होरं. लई जड जानार ! "

नेहमींप्रमाणं सारजेनं याचंहि कांहीं उत्तर दिलं नाहीं. मग धोंडी आपलं आवडतं वाक्य बोलून उठला,

" इच्या मारी ! बायकाची जात वजवाट्ळं करनार समद्याचं ! शीता-माईच्या पाईं लंकेची होळी झाली ! धुरपदीच्या पाईं माहाभारत घडलं ! "

आज कोंडी विशीच्या दारांत उभा होता, तरी त्याचा उंडगेपणा कांहीं तिळभर उणावला नव्हता.

त्यानं गोऱ्ह्याच्या पाठींत कणका घातला तो असा जोसांत बसला कीं, एवढा तयार गोऱ्हाहि रेंकला. पटकन् धोंडीचं ध्यान तिकडे गेलं. तो तळमळून बोलला,

" कोंडीबा हवालदार ! तुमी असंच करा ! आइकलं का ? "

" काय ? "

" कुराड घेऊन खापलून टाका गोऱ्ह्याला ! "

कोंडी थोडा कसनुसला. पण खांदे उडवीत तो बोलला,

" आतां चांगली आंगुळ घातली पोळ्याची ! पन त्याचं लक्शेन पघा ! डोस्कं मातींत घोळसाया लागला ! "

" आर पर हो ! जनावराची जात. त्याला काई कळतं का ? येड्या, मानसालाबी उमगत न्हाई, तर ह्ये तर मुकं जानवर हाय."

" पर आज पोळा—"

" व्हय ! हाय खरा पोळा. पर त्यो कुनाला ? तुला आन् मला. बर बर ! आतां मुकाट्यानं न्ह्या गुरं घराकड. मी आत्तां जाऊन येतों गडावरनं—"

" दादा, बैलांच्या शिंगाना बांधाया नारळ—"

" घ्या की वान्याकडनं ! जा तुमी म्होरं ! हा आलोंच पघा—"

तेवढ्यांत गदारोळ करीत सका येसकर शेतांत शिरला. धोंडी हवालदाराजवळ येतांच त्यानं जमिनीवर घालून घेतलं अन् फडाफडा थोबाडींत मारून घ्यायला लागला.

*　　　　*　　　　*

तसं पाहिलं तर आज पोळा. पहांटपासून सका येसकर आपला लाडका गोऱ्हा शिनगारीत असायचा.

पण आज त्यानं गोऱ्ह्यापुढं मूठभर बाटुकहि कांहीं टाकलं नाहीं. सकाळपासून तो दारासमोर बसून आपल्या जांवयाला शिव्या घालीत होता. कुणी वाटेनं जातांना दिसलं कीं शिव्यांचा जोर जास्त वाढायचा.

राखेनं भरलेले हात झाडीत येसकरीण दारांत ठाकली. ती दादल्याकडे पाहून चिडीनं बोलली,

" व्हय पर – मी म्हनत्ये—"

" म्हना ! "

" हितं श्या घालीत बसलाय, त्ये हवालदारांना जाऊन का सांगत न्हाई ? "

" मोटी आली श्यानी मला शिकवाया ! तांबडं फुटलं तवा ग्येलतो हवालदाराकडऽ—"

" मंग ? काय बोलले ? इत्का गावगाडा वढीत्यात, तर आमचं म्हारा-घरचं भांडन काय जड हाय होय त्येन्ला मिटवायला ? "

" अग पर – भ्येटलच न्हाई ! "

" पुन्ना जाऊन पघा. ह्या म्येल्याची काई तरी वाट लावा, तवा माजा जीव थंडगार हुईल."

" व्हय व्हय. त्येच्या बायलीला – कवा तरी मी मुडदा पाडनार त्याचा ! "

राखेचा हात हनुवटीखालीं टेकवून येसकरीण म्हणाली,

" खरं का काय ? त्यो पांडरा सोमवार कवा उगवनार ? मी दारांत आरती घेऊन हुबी न्हाईन पघा तुमाला ववाळायला ! येक उलट्या पिसाची कोंबडी टाकीन तुमच्यावरून उतरून ! "

तावातावानं येसकर उभा राहिला. येसकरणीकडे हात नाचवीत तो बोलला,

" ए ! मला राग आनूं नगस ! बरं व्हायाचं न्हाई—"

" अव, तुमच्याशीं लगीन झालं तवाच माजं जें व्हायाचं त्ये काळं पांडरं झालं. आतां आपल्या जावयाचं पघा. म्येल्यानं – मुडदा ग्येला त्येचा – माझ्या लेकीला गुरावानी मारलं—"

येसकरानं आपलीं घुंगरं लावलेली काठी उचलली, आणि लांब ढांगा टाकीत तो गांवाकडे चालला. आक्या कोळी टकळीवर दोऱ्याला पीळ भरीत भेंडीच्या झाडाखालीं उभा होता. त्यानं येसकराचं तोंड वाजतांना ऐकलंन्, अन् म्हणाला,

" आर पर हो !–पर हो ! इक्ता का फाटा फुटलाय् ! "

येसकरानं आक्याजवळ सगळा पाढा वाचला, आणि शेवटीं आणभाक केली,

" आता हवालदारांना सांगून न जांवयाचा काटा काडला, तर पुन्ना मिशी कांई ठेवायचा न्हाई ! "

" आर, हवालदार गेले निवद घेऊन श्येताकड. आज पोळा नव्ह का ?"

" आर त्येच्या बायलीला ! पार इसरलोंच कीं ! तिकड ग्येलं पाहिजे."

येसकर मोहरा वळवून शेताकडे निघाला. त्यानं धोंडीला गांठलंन् अन् लोळण घेतली.

* * *

धोंडीला कांहीं उमगेना. शेवटीं ता गागला,

" आर चंडाळा ! तुजं खरं हाय ! सारा जैलम असाच जायाचा तुमचा. पर माजं भात – लोळून पाक त्याचं वाट्टुळं क्येलंस की र ! "

मग सका उठून उभा राहिला, अन् फटाक्यांची लड फुटल्यागत बोलला,

" हवालदार, एक तर माजा मुडदा पाडा – नाई तर माज्या दावेदाराचा.–त्येच्या बायलीला – अक्षी गाईवानी कुटली बगा माज्या लेकीला—"

" कुनी ? "

" जावयानं – त्याचा मुडदा पाडीन तवा माजा जीव थंड पडल—"

" कवा मारलंन् ? "

" आज सकाळींच गागत आली माजी लेक—"

" आर तुझी लेकबी अकरा टिकलोंचीच हाय. तिनंच चिडिवला असल त्याला."

" कसं बोलनं हवालदार ह्ये ! तसा एखाददुसरा तडाखा आमीबी मारीतों बायलीला. बाई आन् ढोर मारल्याबिगर सरळ यायाचंच न्हाई. पर ह्ये कसलं मारनं ? सुजलीया पोर निसती—"

" बरं बरं ! तुझी पोर म्हंजी माजीबी पोरच हाय ती ! सांजच्या पारीं कचेरींत ये. आजचा पोळा,–एवढा उलगून जाऊं द्ये. मग करूं याचा बंदुबस्त. घेतली मीं तुझी फिर्याद. जा ! "

हवालदाराचे हे मऊसूद शब्द ऐकून येसकराचं मन हरिखलं. त्यानं हवालदाराला जव्हार घातला, अन् जांवयाचा वंशाच्या वंश निर्दाळण्याची प्रतिज्ञा करीत तो परतला.

हवालदार गडाकडे निघाला. वाटेंतलीं टेपं अन् ओघळी पार करीत त्यानं चढ गांठला. तों त्याला चार–सहा बापये गडी त्याच्यापुढं चढतांना दिसले.

हवालदाराची परवानगी न घेतां गडावर चालले हे ? काय हें ? केवढी अमर्यादा ! धोंडीचा कपाळशूळ उठला. त्यानं हांक ठोकली,

"कौन हाय त्ये ! उभे ऱ्हा ! अ ऽ गडी ! म्होरं जाऊं नका !"

त्या बाप्यांपावेतों हांक पोंचली. ते थांबले. धोंडीनं झपाझप पावलं उचलीत त्यांना गांठलं अन् सवाल केला,

"कोन गांव ?"

"आम्ही तिकडले सोलापुराकडले—"

"निगालां कुटं ?"

"गड पहायला."

"गड पहायला ! बिन इच्यारतांच ?"

"कुणाला ?"

"कुनाला ? हवालदाराला. अजून जिता हाय त्यो !"

"अहो पाहुण ! ही मंडळी थोरामोठ्याकडली आहे—लोकलबोर्डाचे अध्यक्ष—"

"कुना बाच्छाकडली मंडळी का असना ! रीतीचं काम क्येलंच पाहिजे."

"अहो, पण या हवालदाराला कुठं शोधायचं ?"

"मीच हाय हवालदार."

"तुम्हीच ना ? झालं तर मग;– आहांच आमच्याबरोबर— "

"ऊंहूं ! तेवढ्यानं भागायचं न्हाई ! अदुगर मला इच्यारा ! मंग मी परवानगी दिल्यावर गड चढा. परवानगीबिगर न्हाई."

"बरं हवालदार ! आम्ही गड पाहूं का ?"

"हां, आतां कसं ? अव, या रीती आपुनच पाळायच्या ! जावा कीं ! समदा गड हिंडून पघा. मला येळ न्हाई आतां. न्हाई तर म्यांच दावला असता."

" काय हो हवालदार, एक विचारूं का ? "

" इच्यारा कीं."

" सरकारांतून तुम्हांला कांहीं मिळतं का ? का आपली फुकटचीच हवालदारकी ? "

" तसं कश्यापाई ? नजराना मिळतो कीं ! "

" किती ? "

" सालाचे तीन रुपये साडेपांच आने—"

मंडळी फुसफुस हंसलेली पाहून हवालदार डौलानं बोलला,

" हंसताय् कशापाई ! "

" अहो हवालदार, हे आमचे मित्र – यांना सरकार साडेतीनशें पगार देतं—"

धोंडीची छाती उंचावली. तो बोलला,

" व्हय ! साडेतीन हजारबी देत असल ! पर मंडळी, तुम्हांला भेटतो त्यो हाय् नोकरीचा पगार ! अन् मला भेटतो त्याला नजराना म्हंत्यात ! "

मग पुढं कोणी कांहीं बोललं नाहीं.

धोंडीनं चढांतलं वळण मागं टाकलं. त्याच्यापुढल्या नाकाडावरल्या पायऱ्या पार ढांसळल्या होत्या. नवखा गडी एकदां तरी तिथं लोटांगण घातल्याशिवाय रहायचा नाहीं. पण धोंडी सपासपा तो जिना चढून गेला, अन् दरवाजांत उभा राहिला.

भला भक्कम दगडी उंबरा, वरचं पक्कं चिरेबंदी काम, एवढंच शिल्लक राहिलं होतं. लांकडी फळ्यांचा पार चुना झाला होता. मागच्या बाजूला उभा करून चिराळला अडसर ठेवला होता.

धोंडी आपल्याशींच पुटपुटला,

" या सुतारान्ला निसतीं बलुतीं हदडायला हवीं ! आज धाईस वर्सं सारखा गागतोंय् त्यांच्या मागं—इक्ता त्यो दरवजा उबा करायचा हाय म्हून ! हीं वडारंबी निस्ती थापा मारीत्यात. आज तोडी पाडीतो – उद्यां तोडी पाडीतो ! त्यो बुरुंज पडाया झाला—! "

ऊन्ह डोईवर चटकायला लागलं, तेव्हां हवालदार तिथून हालला. त्यानं

## पवनाकांठचा धोंडी

बालेकिल्ल्याची चढण चढून महादेवाचा कडा गांठला. देवाला नैवेद्य दाखवून हात जोडून धोंडी बोलला,

" द्येवा, तुजा ह्यो गड पार पडाया झाला. तुलाबी कशी काळजी न्हाई त्याची ? पर तू तरी काय करनार ! आमी हालतीं बोलतीं मानसं असून ध्यान दीना झालों, तर तूं तर दगडाचा द्येव. कायबी का करीनास ! तुजं तुला. "

* * *

गांवदेवाचं नांव वाघोबा. त्या देवळाजवळ भला मोठा उतार होता.

देवासमोर आरज्या मांग मारे रंगांत येऊन डफडं वाजवीत होता. म्हातारा गबा गुरव मध्येंच अवसानांत येऊन शिंगाचा धुधुत्कार करी, अन् मग दम लागल्यानं हांफत बसे. वाट मोकळी सोडून दुतर्फा बायाबापड्या अन् पोरंसोरं ओट्यांवर जमलीं होतीं.

या उतारावरून आज पोळ्याचे बैल धांवायचे. अंगावर गेरवाचे छापे काढलेले. घुंगुरमाळा घातलेले. झुलींनीं सजवलेले. गोंड्यांनीं शिंगं शिणगारलेले. त्यांच्या कपाळावर नारळ बांधायचे. पार उताराच्या खालीं तरण्याताठ्या गड्यांनीं उभं राहायचं; अन् बैलांच्या पळींत घुसून कपाळावरले नारळ सोडवून, हिसकून घ्यायचे.

आयाबाया कलाकलाकला बडबडत होत्या—

" ए: भिम्ये ! मपल्या दादाचा गोऱ्हा पघ आज ! कसा नंदीवानी फुगलाय्. "

" अग जा ! मला नग सांगूस तुजा नंदीचा तोरा ! माझ्या जोडीवानी जोड हाय का तुजी ? "

" भिम्ये ! का ग तिला दापीती ? ती तुजी कसनुशा रंगाची जोडीच किनई ? बयागय ! जसा पिंजराच हाये हाडकांचा ! "

" ए बायांनू ! बैल आलं ऽ बर का ! उगी ऱ्हा मुकाट्यानं ! "

" व्हय् ग व्हय् ! समद्याच्या म्होरं जोडी कुनाची ग ती ? त्या किसन्यानं कासरा धरला ती ? "

" डोळ्यांत वाइच त्याल घाल इटकरीचं. हवालदाराची जोडी वळखना तुला ? "

" व्हय् ग व्हय् ! त्यो मागं धाकला हवालदार नव्ह का ! "

सगळे बैल चढावर थांबले. कोंडी, ग्येना, न्हाव्याचा किशा, आणखी पांच-दहा गडी खालीं येऊन उभे ठाकले. धोंडी हवालदार जरतारी शेमला बांधून रामराम घेत देवळाच्या पायऱ्यांवर येऊन बसला. त्याच्या शेजारीं भुजा माळी, म्हातारा केरबा हाटकर, परशा लोहार, किशा न्हाव्याचा बाप लक्षा,–अशीं दहा-वीस वयस्कर माणसं आदबीनं बसलीं.

धोंडीनं पुसलं,

" का मंडळी, झाली का तयारी ? "

" व्हय, झाली. तुमची यायचीच वाट हुती. "

" तर मंग चालूं द्या ! आरज्या,–हुं ! "

मुजरा करून आरज्या पुन: डफड्यावर भिडला. गबा गुरवानं शिंगाची साद घातली. सगळ्या मंडळींच्या डोळ्यांत पोळा चढलेला दिसायला लागला. त्यांनीं आरोळी ठोकली,

" वाघोबाचा चांग भले ! "

अन् वरच्या गड्यांनीं बैलांपुढली दोरी बाजूला घेऊन मोळांच्या कडाक्यांचे आवाज काढले. या माणसांच्या कलकलाटानं अन् शिंगा–डफड्याच्या धुमधुमीनं बैल अस्वस्थ झाले होते. अडसर निघालेला पाहतांच ते शेपट्या उभारून चौखुर पळत सुटले.

'भले, हे र गडी ऽ ' असा एकच गलगा झाला. पोरं किंचाळायला लागलीं. धाकटीं आरडायला लागलीं. पोरींनीं 'ये बया 'चा चीत्कार फोडला.

कोंडी अन् त्याचे जोडीदार अवसान बांधून उभे होते. हवालदाराची काळी जोडी शिंगं फेंकीत उधळत आली. कोंडी मस्तींत पुढं झाला. पण बैल त्याच्या पकडींतून निसटले. हें पाहून किशा न्हाव्यानं त्यांच्यावर झेंप घेतली, अन् एका हिसक्यासरशीं नारळ त्याच्या हातीं आले !

क्षणभर कोंडीला काय झालं तें कळलं नाहीं. पण जेव्हां त्याला घडला प्रकार उमगला तेव्हां तिरमिरीनं तो पुढं झाला, अन् त्या बैलांच्या धुमाळींतच त्यानं किशाच्या मुस्कुटांत भडकावली ! किशाचं त्याचं अगोदरच सूत नव्हतं. त्यांत ही आग ! अन् मग एकच गलगा उसळला.—

" आर हो ! "

" कोंडीबा ! मागं हो ! "

" ए किशा ! गुमान ऱ्हा ! हवालदार येत्यात. त्यांना न्याव करूं दे !"

" हान कोंडीबा तूं ! "

" अर मागं सरा ! "

" म्हंजी ही तर मोगलाईच झाली ! "

" तिच्या बायलीला— "

सगळी मंडळी थक्क झाली. शेवटीं स्वतः धोंडीनं पुढं होऊन कोंडीला मागं ओढलं. किशा अपराध्यासारखा बोलला,

" हवालदार, माजी चूक असल तर माज्या डोक्शांत शंबर जोडं हाना, अन् धा मोजा—"

" आर हो पर !— जरा थंड हो ! "

" ए ऱ्हावगंडा, तुला लई जोर हाय तुज्या तालमीचा – येत्या वागोबाच्या उरसांत—"

" ए कोंड्या, तूं मुकाट बस ! गाडवा, तुजीच चुक हाय ! "

" हवालदारदादा, आमी तुमच्या आसऱ्यानं ऱ्हातों, आज इकत्या पिढ्या—"

" ए म्हातारड्या लक्ष्या ! तुजाच लई जोर हाय तुज्या पोराला – पर औंदा उरसाच्या हगाम्यांत त्याला उमगल्—"

" बर बर ! उरसाला अजून लई येळ हाय. चला आतां, जावा घरोघर ! किशा, तुझी काई चूक न्हाई, पर कोंड्याचं माथच लई गरम ! "

धोंडीनं किशाला थोपटीत त्या गलग्यांतून बाहेर काढलं. त्याला घेऊन तो घरीं गेला. सारजीला हांकारून बोलला,

" आइकलं का ? "

दाराआड सारजेचीं कांकणं वाजलीं.

" तुमच्या लाडक्या दिरानं आज किशा न्हाव्याचं कांडात काडलं ! तुमच्या लाडानं वाट्टळं होणार पोराचं ! "

" लई मारलं ? व्हय किश्या ? "

" लई अन् थोडं ! इकत्या मंडळींत हानलं त्यानं किशाला—"

" याचाच काई तरी अप्राद असल—"

" तर तर ! तुमच्यावानी दिरा–भावजयीची जोडी समद्या जगांत कुटंबी घावायची न्हाई. आतां या किशाला जेवाया वाडा—"

" नग दादा—"

" का र ऽ ? रागावलास व्हय् हवालदारावर ? "

" तुमच्यावानी द्येव–मानसावर कोण रागवल ? पर—"

" आर, पर असत्यात कोंबडीला. जेऊन घे ! "

त्याला बळंबळं जेवायला वाढून धोंडी कचेरींत जाऊन बसला. घरासमोरच्या पडवीला कचेरी हें जाडंजुडं नांव होतं. त्यानं खिशांतली चिलीम काढली. तमाखूची चिमूट हातावर घोळून ती चिलमींत भरली. कमरेचं चकमकदान काढलं. गारेच्या टेपीवर गुल ठेवला. चकमक झाडल्याबरोबर त्यांत ठिणगी पडली. त्याला थोडं हालवून धोंडीनं वारा पाजला. मग तो गुल चिलमीवर ठेवून आंगठ्यानं दाबला.

छापी नेसवून त्यानं चिलमींतून धुराचा लोट काढला, अन् त्याच्या धुरांत तसाच भिंतीला टेकून तो बसून राहिला. आज त्याच्या डोक्यांत विचारांची वावटळ घुमायला लागली.

हें असं कधीं घडलं नव्हतं.

हवालदाराच्या घराण्यांतला कोंडी हा एकटाच दिवा. धोंडीनं त्याला जिवाच्या पलीकडे वागवलं होतं. त्याचं जितकं प्रेम हवालदारीवर, जितकं जमिनीवर, तितकंच कोंडीवर होतं.

तो असा वाकडं वागायला लागला. अंगांत रग आहे;–तरी काय झालं ? किशा होता म्हणून त्यानं ऐकून घेतलं. दुसरा एखादा माघारीं वळून मारता तर ? एखादाच घाव पुरे. तेवढ्यानंच अब्रू जाती. लोक ओरडते, कोंडी हवालदाराला न्हाव्यानं मारलं.

छा छा !

हें बरं नव्हे ! हें बरं नव्हे—!

पण बरं नव्हे हें आपल्याकडून झालं. कोंडी तर आपलंच बरोबर म्हणणार. अन् त्याची भावजय त्याला साथ देणार—न बोलतां !

ह्या ! बायांची जात ही अशीच !

सीतामाईच्या पाई लंकेची होळी झाली ! द्रौपदीच्या पायीं महाभारत घडलं !

किती वेळ गेला कोण जाणे. सारजा कधीं ठाणवईवर दिवा ठेवून गेली, धोंडीला कळलं नाहीं. तो जागा झाला सका येसकराच्या हळीनं.

" जव्हार, हवालदार ! "

धोंडी भानावर आला. सकाला पाहून त्याचं डोकं अधिकच उठलं. तो भडकून बोलला,

" सक्या, तू गाडाव हायेस ! पक्का गाडाव—"

" हवालदार, पर माझा जांवाई—"

" त्योबी गाडाव—"

" पर माजी पोर म्हंती—"

" काय म्हंती ? "

" मी मपल्या घरीं जात्ये—"

" तीबी गाडाव हाये ! जाऊं नको देऊं ! इक्तं मारलं जांवयानं तरी पुन्ना जात्ये म्हंती, बांदून घाल खुटीला ! आपल्या गांवाची काई इशीम हाय कीं न्हाई ! आर इच्या मारी ! हा तर अन्यावच झाला ! कुनींबी उटावं ! कुनालाबी मारावं. काई न्हान, मोटं ? आबरू, मानमर्तब ? आन् त्यो जांवाई पुन्ना दिसला तर माज्याकड आन कचेरींत,–म्यां घेतलीया म्हनावं तुझी फिर्याद—"

" हवालदार, पर त्यो—"

" काय झालं ? "

" येळा घेऊन समजावनीला आलाय्—"

धोंडी अधिकच भडकला.

" आर चंडाळा ! मारून पुन्ना समजावनी ? आन त्याला हिकडं. माज्या संबूर चार लाथा घाल कमरेंत ! काई मान, मर्तब ? आं ? जा जा !—हुबा नग न्हाऊस खुटावानी ! नीग—"

तोंच सकाची येसकरीण त्याला बोलवायला आली.

" अव येसकर ! "

" का व ? "

" मिटलं भांडान. चला घरीं आतां."

" मिटलं ? काय झालं ? "

" तीं दोगं गेलीं घरीं. येळा कशा सोबून दिसल्या माज्या लेकीच्या दंडांत—"

धोंडी गरजला,

" सक्या ! तू गाडाव ! तुजी बाईल सात गाडाव ! माज्याकड आली होती फिर्याद—कचेरींत. परस्पर तोडली कशी तुमी ? हवालदाराचा मान न्हायला न्हाई. कुनीबी उटावं—काईबी करावं. कुनाला धरबंद न्हायला न्हाई ! "

पटापट थोबाडींत मारून घेत सका बोलला,

" अस कस व्हईल, हवालदार ? अंगांत किडऽ पडतील माज्या—आंग झडल् समदं—"

" पुर झाला त्यो तमाशा ! जा—नीग माज्या समोरून ! "

धोंडी तरातरा आंत गेला. जीन अंथरून त्याच्यावर त्यानं अंग टाकलं. सारजाचीं कांकणं किणकिणलीं; मागून आवाज आला,—

" जेवायचं न्हाई ? "

" न्हाई, न्हाई ! "

" आज सनासुदीचं— "

" माजं डोस्कं पिकलया ! जा आतां. पडूं द्या वाइच ! "

धोंडीला वाटलं, सगळं जग ढासळायला बघतंय्. एकटी आपलीच्च धडपड चालली आहे तें सांवरून धरायची. केंविलवाणी धडपड.

* * *

पुढला दुधाचा तांब्या दूर लोटून कोंडी बोलला,

" व्हयनी, नग मला त्ये तसलं दूद ! निसतं पान्यावानी—"

" काय झालं भावजी ? "

" काईबी झालं न्हाई,—पर मला ह्ये दूद नग ! "

" का व ? "

" त्येला काई चव का ढव ? निसती गंगा जशी काय ! ह्ये पिऊन तयारी भरतीया ? "

" पर भावजी, ह्ये गाईचं दूद हाय."

" हाय ठावं मला. गाईच्या दुदावर म्हेनत होत न्हाई, न्हाऊं द्ये—"

" पर—"

" न्हाई न्हाई ! पडूं द्ये मला कुस्तींत ! न्हाव्याच्या हातून मार खाऊं द्ये ! "

" म्हननं का हाय तुमचं ? – त्ये तरी सांगा ! "

" काई म्हननं न्हाई ! एवढं बखळ पिकतं, त्येचा पैका करून पुरून ठयेवा—"

तणतणत कोंडी ओटीवर गेला. फासकदिशीं त्यानं खुंटीवरचा फेटा काढला, अन् तावातावानं डोईला गुंडाळायला लागला.

सारजा घाबरून दारांत उभी राहिली. ती काकुळतीनं म्हणाली,

" भावजी, जाऊं नका भाएर ! हिकडं या—"

" न्हाई ! मी निगालों—"

" कुटं ? "

" कुटं ? कुटं बी ! न्हाव्याच्या हातून मार खान्यापरीस मी कुनकडबी जाईन ! कुनीबी आईबाई मला भाकर घालील. मी तिला सांगन, मला कोनीबी न्हाई ! आई न्हाई, बा न्हाई, भाऊ न्हाई, व्हयनी न्हाई ! येकलाच हाय मी ! तिकड कायबी—हमाली करीन ! एका जिवाला लागतं कितीक ? "

सारजाचे डोळे पाणावले. ती म्हणाली,

" भावजी, तुमाला शिप्पत हाय—"

" कुनाची ? "

" माजी—"

कोंडीनं वहिनीच्या डोळ्यांतलं पाणी पाहिलं, तेव्हां मग त्याला वाटलं, आपलं काम होणार ! तो बोलला,

" तूं लई वाईट हायेस—"

" असूं दे ! हिकडं या तुमी—"

" काय म्हंतीस ? "

" हां ! अंग आस्सं ! येड्यावानी काय करता भावजी ? तें दूद पिऊन टाका—गोरस हाय त्यो. त्याला लात मारून जाऊं नगा."

" आजचा दीस पीन—"

" आन उंद्या ? "

" उंद्या ? उंद्या म्हशीचं—"

" म्हस ? हाय कुटं म्हस ? "

" न्हाई तर घ्ये कीं ! "

" अग माजी बया ! लई कातावतील त्ये—"

" त्ये काईबी कर ! मला म्हस व्यायाची—"

" व्हय पर—"

" व्हयनी, यकदाचं सांगून टाक, तुजा कोंड्या जिताया हवा की न्हाई ? "

" व्हय, हवा खरा – पर गांवातल्या गांवांत कसली इरसरी ? "

" त्ये काई न्हाई. त्यानंबी तयारी धरलीया. तवा माजा बोल मला खरा क्येला पायजे. मंग सांगशील ना दादाला ? "

" बगत्ये सांगून."

" बगत्ये न्हाई; घेतली पायजे म्हस ! "

दुधाचा तांब्या संपवून कोंड्या नदीवर आंघोळीला निघाला. न्याहारीची टोपली घेऊन सारजा बाहेर पडली,–ती तडक शेतावर आली.

पवनाकांठचा पाव एकराचा तुकडा धोंडीच्या आजोबानं बागाइतींत काढला. या दहा एकरांजवळ पवना अगदीं बांधाला खेटून वहात होती. नदीचं पात्र लहान. पावसाळ्यांत पूर आला तरी कधींमधींच पुराचं पाणी शेतांत शिरायचं. उन्हाळ्याचे चार महिने पाण्याला खंड पडायचे. तरी दहा एकरांजवळ लहानसा डोह होता, त्या डोहावर माची बांधून तिथं धोंडीच्या आजोबानं ओकती बसविली होती.

विहीर खणणं कांहीं धोंडीला फारसं अवघड नव्हतं. पण पुनः मर्यादा

आड उभी राहिली ! वडिलांनीं केलेलं कसं मोडायचं ? वाडवडिलांची कावड चालवायची. तेव्हां आजपर्यंत मग ओकतीनंच धोंडी पाणी उपशीत राहिला.

त्या पाव एकरांत कांदा, लसूण, मेथी, शेपू, वांगीं, असा घरच्यापुरता भाजीपाला व्हायचा. एक पीक काढलं कीं आलटून पालटून दुसरं बीं पेरायचं. वाफेहि असे झकास बांधले होते ! पाण्याचा थेंब काय बाहेर जाईल ! दांड होते मातीचेच; पण सिमिटानं बांधलेल्या दांडाच्या तोंडांत मारतील असे !

धोंडी कधीं शाळेंत गेला नाहीं. कधीं चित्रकला शिकला नाहीं. पण पाणी असं गमतीनं फिरवलं होतंन् ! नागमोडीगत. रेखीव. आंखीव. कांद्याचे ठोंब उभे दिसतील,—तेसुद्धां एका रेषेंत. तीच गत वांग्याच्या रोपांची. तीच गत मुळ्याची. वाकडं रोप लागतांना दिसलं, कीं तो गड्या-वर गागायचा,

" किसन्या, ल्येका येत्या बाजाराला तुजा पगार घेऊन जा ! "

" का व दादा ? "

" नग मला तुजं काम ! "

" न्हाई पर—"

" पर असत्यात कोमडीला ! मर्दा, ह्ये काय रोप लावनं हाय का आपली निसती थट्टाच हाय ? "

" न्हवं—"

" अर मर्दा, कामावर तुमची सरदा न्हाई. कशी तरी बिगार टाकायची!"

किसन्या लहानपणापासून धोंडीकडे कामाला होता. हा दम त्याला अनेकदां मिळाला होता. त्यानं मुकाट्यानं रोप उपटून नीट सूत धरून लावावं.

आज पहाटेपासून धोंडी ओकतीनं पाणी उपशीत होता. थंडीचे दिवस. पण त्याचं उघडं अंग घामानं थबथबलं होतं. ओकतीची मेढ करकर करीत होती. तिच्या तालावर धोंडी चार पावलं टाकीत पाण्याची बादली खालीं ओढायचा. एका डुबकींत ती पाण्यानं भरायची; दोरावरचा जोर ढिला केला कीं पलीकडच्या दगडाच्या भारानं आपसुक बादली वर यायची. एका लयींत धोंडी ती थारोळ्यांत रिती करायचा; – कीं पुनः चार पावलं.

त्याच्या खाल्ल्याप्प्यायल्या शरिराची तयारी प्रत्येक पवित्र्यागणीक जशी उठून दिसायची. प्रत्येक हालचालीगणीक नवा स्नायु उभारून वर यायचा. नव्या आवेशानं. नव्या दिमाखानं. जसं यंत्र फिरतंय् एखादं.

पण, स्वतः यंत्राला मात्र त्याचं भान नव्हतं. त्याचं लक्ष ओकतीवर तर होतंच, पण किशा पाणी कसं फिरवतो आहे इकडेहि तें होतं. मधूनच तो आरडायचा,

" आर ए गाडवा, त्यो वापा हादरला बग तुझ्या फावड्यानं ! कसं चाललंय् फावडं ! जसा काय दुस्मानाच्या अंगावर चालला हाय त्याचा हात ! अर जरा मऊ हातानं फावडं चालवावं ! जरा मायेनं ! आपुकीनं ! "

सारजा न्याहारीची पाटी घेऊन आली. ती बाभळीखालीं ठेवून तिनं मातीची कळशी ताज्या पाण्यानं भरली, अन् धोंडीची वाट पहात बसली. त्याला हांक मारण्यांत कांहीं स्वारस्य नव्हतं. काम संपल्याशिवाय तो कसचा येतोय् !

पाण्याची पाळी फिरली. घाम पुशीत धोंडी किसन्याला बोलला,

" किसनराव, न्यारी झाली का येकदा गाईंना पाणी दाकवा."

" दिसत न्हाईंत त्या कुटं ? "

" आर त्यो दांड सोडून पलीकडं जातील कुटं ? येका हारीनं मारवेलाचे खुट आनून लावले हायेत. बरं का ! न्हाई तर बसाल कावळे मारीत ! "

बाभळीखालीं बसल्यावर सारजानं वाढलेली थाळी धोंडीनं समोर ओढली.

" ह्ये का हाय ? "

" चार मुगवड्या परतल्यात. तुमाला आवडत्यात—"

" अन् माज्या येकल्याच्या थाळींत ? किसन्याला—"

" चारच व्हत्या. तुमच्यापुरत्या—"

" अव, चार असूं द्या न्हाई तर धा असूं द्या. समद्यांनीं सारकं खावं. येकाला उनं आन् दुसऱ्याला दुनं, ह्ये बरं न्हव. वाडवडिलांनीं असं क्येलं न्हाई. आपलं घरानं हवालदाराचं. हा लौकिक आपुनच सांबाळाया हवा. वाडा किसन्याच्या थाळींत."

मुगवड्या किसन्याच्या थाळींत वाढून सारजा म्हणाली,

" आज सांजच्या पारीं—"

" काय ? "

" न्हाई, वडगांवला बाजाराला जायाला हवं."

" कशापाई ? "

" म्हस आनायची येक."

थोडा वेळ धोंडी घास तसाच हातांत धरून सारजेच्या तोंडाकडे पहात बसून राहिला. मग चढ्या आवाजांत बोलला,

" लाडक्या दिराला दूद प्याया हवी असल ? "

सारजा खालीं पहात राहिली.

" त्या चंडाळाला म्हणावं, गाईचं दूद कां गोड लागना तुला ? आं ? आर म्हशीचं दूद पिऊन हेल्यावानी बुद्धि व्हईल ! आपल्या घरान्यांत आज-पात्तुर म्हस आनली हुती का कुनी ? आमची तयारी बघ म्हनावं ! निसत्या गाईच्या दुदावर झाली ! आन् तयारी व्हायाला म्हशीचं दुद लागतं ? किसनद्येव कुनच्या म्हशीचं दूद प्यायला हुता ? इच्यार त्या गाडवाला ! "

मध्येंच किसन्यानं तोंड घातलं,—

" न्हाईबा ! मी तर बकरीचं दूद पितों—"

" श्याहाना हायेस गाडवा ! उमगलं न्हाई तर मर्दी मर्दी बोलूं न्हाई. तूं किसना न्हव, किसनद्येवाचं इच्यारतों मी. गोपालकिस्नाचं ! आं ? "

बाभळीच्या फांदीवर एक कावळा मोठ्या आशेनं ताटांतल्या नागलीच्या भाकरीकडे पहात होता. त्याच्याकडे एक तुकडा फेंकून धोंडी ओरडला,

" हाड्या ! धिला तुकडा. जा आतां. आन् त्याला इच्यारा, शेताकड कवा ध्यान द्यायाचं म्हनावं ! न्हानपनापून तुमच्या लाडानं पोरगा कामांतून ग्येला ! अन् आतां त्या न्हाव्याच्या पोरावर तयारी धरलीया. त्याला म्हनावं म्हसबीस काई मिळायची न्हाई."

सारजा तशीच गप्प बसून राहिली. न्याहरी आटोपल्यावर धोंडी भली थोरली ढेकर देत उठला, तेव्हां पाटी आवरीत ती म्हणाली,

" मंग जायाला हवं वडगांवला."

धोंडी कडकडला,

" तुमा दीरभावजईचं ठरलंच म्हना की ! या बायकांची जात वजंवाट्टुळं करनार समद्यांचं ! शितामाईच्या पाई लंकेची होळी झाली—"

सारजा तोंडाला पदर लावून हंसूं दाबीत उठली. तिला माहीत होतं, नाइलाज झाल्यावर धोंडी नेहमीं तो मंत्र जपत असे.

* * *

पहाटेस बैल घेऊन औताची जुपी करायला धोंडी शेतांत निघाला. कासरे अन् जुंपणांचं ओझं त्यानं डोक्यावर घेतलं. कोंडी अजून लोळत होता. धोंडी हांकारून बोलला,

" आइकलं का ? तुमच्या पैलवान दिराला शेताकडं द्या धाडून. आमी लागतों तोपत्तर कामाला."

तो बैलांना पुढं करून निघाला. वळणापावेतों गेला असेल नसेल,—तों भुजा माळी भेटला. अजीजीच्या स्वरांत तो बोलला,

" हवालदार दादा, तुम्हाकडंच निघालों व्हतों."

" कशापाई ? "

" छाः ! असं उभ्या उभ्या न्हाई व्हायाचं काम."

" मंग शेतावर चला. वाद्दळ झाला. आतांपोत्तर जुपी व्हायाला पाहिजे व्हती."

" चला. जुपी करतां करतां सांगतों तुमाला."

दोघे शेतावर पोंचले. किसना बैल घेऊन आला. काल जिथवर कुळवणं झालं होतं त्याच्यापुढं अर्ध्या पातीवर कुळव सोडून ठेवले होते. बैलांच्या पाठीवर थाप मारीत धोंडीनं त्यांना सरसं केलं. त्यांनीं उमजून शिळवाटींत माना दिल्या. शिवळा लावीत धोंडीनं किसनाला विचारलं,

" किसना ? "

" जी ! "

" चंद्याच्या पाठीवर माशी का र बसती ? "

" काल बाभळीला आंग घासलंन्, तवा लागलं असल."

" कुठली बाबूळ अन बिबूळ ! तूच मारला असशील तडाका ! घरीं गेल्यावर त्यान्‌ला वाइच हळद टाकाया सांग तिथं. हां,—बोला भुजाबा ! "

" काई बोलायाजोगं ऱ्हाइलं न्हाई हवालदार ! माजा बारदाना बसला ! "

" तसं कां ? सर्जा काईच पाठवीना झाला व्हय ममईहून ? "

" त्यो पाटवीनाबी झाला ! आन् बैलबी बसला माजा. येकच बैल उरला."

" आर आर ! मंग नांगरनी आटपली का न्हाई ? "

" न्हाई अजून."

" मंग आतां कसं ? "

" मी इर्जिकीचं म्हनत हुतों—"

" म्हना कीं ! पर ह्ये पहा भुजाबा, दुसरा कंचाबी उपाय ऱ्हायला न्हाई म्हंजी इर्जिकीचं नांव घ्यावं मानसानं. जंवर अंगांत ताकत हाय, हिंमत हाय, तंवर त्यो इच्यारबी आनूं नका."

थोडं थांबून भुजा बोलला,

" खरं हाय हवालदार तुमचं म्हननं. पर आतां ताकत ऱ्हायली न्हाई. "

" कां व ? वर्सं किती तुमाला ? "

" तसं का ? तुमच्यापरीस धा वर्सांनीं थोरला हाय मी."

" म्हंजी ह्यॆंच कीं—पन्नास-साट ! साटींत माजा आजा बुक्कीनं नारळ फोडीत आस ऽ ! "

" झालं तुमचं म्हननं. पर हाताचीं बोटंबी सारकीं नसत्यात, आन् बोटांची पेरंबी ल्हान-मोटीं असत्यात."

" ब ऽ र ! मंग झाला का पक्का इच्यार इर्जिकीचा ? "

" त्ये तुमीच बगा. गांवचं हवालदार तुमी."

" ठीक हाय ! "

संध्याकाळीं येसकरानं कचेरीपुढं जमायची हळी दिली. मंडळी जमल्यावर धोंडीबा बोलला,

" मंग कसं केरबा ? "

" बलिवलं कशापाई ? "

" आपल्या भुजाबाच्या श्यातांत इर्जीक ऱ्यायाची. त्याची नांगरनी ऱ्हालीया मागं."

" व्हय खरं ! पन आमचींबी कामं उलागलीं न्हाई अजून ! "

" न्हव तर काय—"

सगळ्यांनीं एकच कालवा केला. धोंडी म्हणाला,

" आर हो पर– ! आमचंबी काम न्हायलंय् अजून. पर काकुळत करून म्हंगाला बापडा ! "

मग कुणी कांहीं बोललं नाहीं. धोंडी म्हणाला,

" मंग कसं गडे हो ? उंद्या मंगळवार. उंद्या मोडा. परवा जायाचं का भुजाबाच्या श्यातांत ? "

केरबा घोंगडी झाडीत उठत म्हणाला,

" हवालदारांच्या सबुदाम्होरं का जातां येतंय् ? "

बुधवार उजाडला, अन् भुजाबाच्या शेतावर नांगरधऱ्या गड्यांची घेमार सुरू झाली. सगळ्यांत पुढं नांगर होता धोंडी हवालदाराचा. त्याच्या मागोमाग दहा नांगर सपासप जमीन फाडीत चालले होते. आसूड कडकायचे. त्यांच्या मुठीला लावलेल्या लोखंडी कुयऱ्या खुळखुळायच्या. नंद्या, सरज्या, इस्पिका, परजेन,– अशा आवाजांनीं गगन गरजलं.

धोंडी हळी देऊन बोलला,

" सुभान्या, आसं मुकामुकाट्यानं कां र ? "

" छाः ! बोलतुंया की. ए गगन ! आर तुझ्या मारी—"

" आर श्या तर इळभरच घेतां. पांचवीलाच पुजल्यात त्या. पर गानं का म्हनीनास ? "

" गानं ? "

" व्हय व्हय् ! "

सुभान्यानं काड्दिशीं आसुडाचा कडाका वाजवला, अन् कानावर हात ठेवून गाणं सुरू केलं—

**गाईच्या नंदेना**
**उभा का न्हायेना**
**तुजवरी झूल**
**चांदी रे सोन्याची**

**चवरी डुलते ।**
**चंदनी वाऱ्याची ॥**

सगळ्या नांगरधऱ्यांनीं सुभान्याच्या सुरांत सूर मिसळला. बैलांना अवसान चढलं. ते पुढं झुकून धुम्‌धुम्‌ नांगर ओढूं लागले. पहातां पहातां नांगरणी उलगली. बैलांच्या शिवळा पाडून धोंडी म्हणाला,

" काय भुजाबा ! झालं ना काम ? "

दाढीच्या खुंटांवरून खालीं ओघळणारीं आंसवं पुशीत भुजाबा म्हणाला,

" हुनार न्हाई म्हंजी काय ? हवालदार आमचा राजा गडी हाय ! अजूनबी समद्या पवनपट्ट्यांत हवालदारांचा बोल परवलीचा सबूद हाय ! त्येनं मनावर घेतलं म्हंजी काम न्हाईल कसं ? आतां आंगुळा-पांगुळा करा. बैल चराया द्या सोडून, अन्‌ असा असा दीस कलल्यावर तांब्या घिऊन यायाचं समद्यांनीं. गरिबाची मीठ-भाकर—"

भुजाबा दिस कलल्याचा हवाला बोलला खरा. पण पंगत बसायला अंधार पडला. गुरवानं मशाली पाजळल्या. फोडलेली जमीनच हातोहात गड्यांनीं सारखी केली. पळसाच्या पत्रावळी ठेवल्या. भले थोरले द्रोण. पुरणपोळी अन्‌ गुळवण्याचा बेत.

धोंडीला भुजाबा म्हणाला,

" हवालदार, तुमीं बसून घ्यायाचं."

" न्हाई. मी मागं थांबनार."

" असं कसं—"

" ए भुजाबा, इत्का म्हातारा झालास ! डोईवर पांढर नांदाया लागली. हवालदारांना पहिल्या पंगतीला बसलेलं कंदी पघितलंस का त्वां ? "

तोंडांत मारून घेत भुजाबा म्हणाला,

" बर ऽ ! न्हायलं ऽ ! चुकलं माजं ! "

पानं वाढून झालीं. पुंडलीक वरदे झाला, अन्‌ मग हातातोंडाची लढाई. भराभर भुरके मारीत मंडळी आमटी ओरपूं लागली. पोळ्यांच्या चळती-मागून चळती उठल्या. गुळवण्याचे हांडे रिकामे झाले. मधूनच एखादा अभंग, पुनः पुंडलीक वरदे. धोंडी आग्रह करीत होता. माळणी पोळ्यांचे पाचुंदे पानांत टाकीत होत्या.

सगळे गडी धापले. पोटांत बोटं खुपसून तपासूं लागले. शिरेना झालीं तेव्हां म्हणाले,

" लई झालं आतां हवालदार ! "

ती पंगत उठल्यावर भुजाबा अन् धोंडी बसले. माळीण वाढीत असतांना बोलली,

" हवालदार भावजी, तुमीं लाज राखली औंदा ! "

* * *

वाघोबाची जत्रा डोईवर उभी ठाकली.

गांवचा जोशी वडगांवला राहून वैद्यकी करायचा. त्याची बायको सदा न् कदा आजारी. पोराच्या पायाला हाड्याव्रण झाला होता. तरी त्याला शिकवलं पाहिजे, म्हणून जोशानं वडगांवला बिऱ्हाड केलं होतंन्.

जत्रा जवळ आली, म्हणून त्यानं गांवाकडे खेप टाकली. घर उघडलं. कोळिष्टकं झाडीत होता, तोंवर लक्ष्या न्हावी दारांत येऊन बसला.

" का जोशीबावा, पोराचं कसं हाय ? "

" आहे तसंच आहे रे बाबा ! पूर्वजन्मींचा भोग आहे—त्याचा नि माझा. भोगला पाहिजे."

" आमचाबी भोगच हाय बगा ! "

" कां रे ? "

लक्षानं तासभर गोष्टींचं चऱ्हाट वळीत पोळ्याच्या दिवसाची हकीकत रंगवून सांगितली, अन् मग म्हणाला,

" जोशीबावा, हवालदाराच्या घराशीं असा दावा उभा ऱ्हायला—"

" दावा कसला आलाय् त्यांत ? "

" अव दावा न्हव तर काय ? धाकला हवालदार आडव्या माथ्याचा-"

" अरे पण थोरला तर आहे ना दहांचा पाळनकर्ता ? "

" व्हय खरं. पर तुमी जाऊन कांहीं मिटवायचं बघा ! "

" किशा काय म्हणतोय् ? "

" त्यो काई ऐकना माजं. म्हनतुया, म्या काई खोडी काडली न्हाई अदुगर. अन् धाकल्या हवालदारानंच हांक घातली. आतां ओ न दील तो अक्करमाशा ! "

" फारच रिशीवर चढलाय् तो ! "
" आतां तुमीच काई तरी करा—"
" करतों करतों. धोंडी हवालदार—"
" त्ये शेतावर भेटनार. घरीं कुठले घावायला ? "
" असूं दे."
जोशी दहा एकरांत पोंचला. त्यानं धोंडीला हांकारलं. धोंडी भाताच्या चोंढ्यांत ढेकळं फोडीत होता. तो बोलला,
" हिकडं हाय् ह ऽ ऽ ! "
जोशी बांध तुडवीत चोंढ्याकडे निघाला. धोंडीला पाहून तो बोलला,
" हवालदार, तुमचीं शेतं चोरून वडगांवला न्यावीं वाटतात."
हंसून धोंडी बोलला,
" का व ? "
" छे ! जसा काळा कुळकुळीत आरसा ! कुठं तण, का काडी, का गचपण ! "
" आमचं कसलं आलंय् राव ! वडलांचं हाय् , त्ये म्होरं चालिवतोंय्."
" शहामत तुमची ! मोतीं पेरलीं तर तींसुद्धां खण्डीनं मोजण्याइतकीं होतील ! "
" घ्या. चिलीम भरा."
" मी नाहीं चिलीम ओढीत अलीकडे."
" मंग ? "
" खाकी – विडी ओढतों. तीसुद्धां एक पहाटे, एक चहा झाल्यावर, एक जेवण उरकल्यावर, अन् एक रात्रीं."
" बरं बुवा तुमचं. आमाला लागला चिलमीचा छंद. आतां जलमभर सुटायची न्हाई."
" हवालदार, कोंड्यानं हें कसलं खेकटं उभं केलं ? "
" कंचं म्हन्ता ? "
" किशा न्हाव्याशीं—"
क्षणभर धोंडी थांबला. मग हातचीं ढेकळं खालीं टाकीत तो जोश्याला बोलला,

" या जोशीबावा. तिकडं हिवराखालीं."

हिवराखालीं बसल्यावर धोंडीनं चिलीम भरली, अन् चकमक झाडीत बोलला,

" जोशीबावा, तुमच वडील हुत, त्यांनींबी पघितलं, तुमींबी पघितलं. हवालदार घरान्याचा सबूद समदा पवनपट्टा हिऱ्यामोत्यावानी झ्येलायचा. हवालदारांनींबी कुनाचं वाईट वकाट क्येलं न्हाई. तुमीं आइकलं असल, इष्टमिन्ट सायब इनामाचे कागुद बगाया आला. तवा हवालदारांनीं आपले कागुद म्होर टाकले. सायब पास बोलला. मंग त्यानं पुसलं, बाकी लोकांचे कागुद दावा. तवा हवालदार शाती फुडं काडून बोलला, ही समदी माजी परजा ! बोलला का न्हाई ? "

" हो; बोलला."

" आंगा आसं ! तर सायेब बोलला, तसलं काई चालायचं न्हाई. यांची जिमीन मी खालसांत घालीतो ! तवा हवालदार तडाकून बोलला, आर ! आज पिड्यान् पिड्या जीं मानसं गांवापाई खपलीं, त्यांची जिमीन खालसा ? जा ! सायबा, माजी बी जिमीन खालसा कर ! तोंडाला काळोखी फाशीतो ! अन् तुझ्या घोड्याम्होरं धावून समद्या गांवागांवांतून पुसत हिंडतो,—का ह्यो आमच्या जिमिनी खालसा करनारा कोन ? खरं का न्हाई ?—"

" खरंच अन् ! खोटं कसं असेल ? "

" तवा सायेब उटला.—टोपी काडली. हवालदाराला सलाम क्येला. बोलला, हवालदारा, समदा गांव तुज्या नांवानं करतो. तवा हवालदार बोलला, नगं तसलं ! कुनाची जिमीन ? राजाची. त्यानं या बलुत्याला अन् कामगारान्ला दिली. त्यांची त्यांच्याकड असूं द्या ! "

" हवालदार, तुमचं घराणंच नेकीचं ! "

" तर जोशीबावा, त्या घरान्यांतला ह्या कोंडी. त्यानं भर मंडळींत उखाना घातला किशा न्हाव्याला. तर मी काय सांगूं त्याला ? त्यो उखाना मोड म्हनून ? "

" मी तरी तसलं म्हणतोंय् का ? पण——"

" जोशीबावा, किशाबी माजा, आन् कोंडीबी माजा ! आन् कुस्ती ह्या

गंमतीचा ख्येळ हाय. इसरला जनूं? येका जत्रंत कुनी नामांकित पैलवान गडी उटना, तवा तुमी अन् मी दोन डाव क्येले हुते?"

"विसरेन कसा? पण हवालदार, आपला काळ वेगळा होता; हा काळ वेगळा आहे."

"काई न्हाई येगळा. येगळा म्हंजी काय? तीच धरती, त्योच सुर्व्या, तीच रात, त्योच दीस, त्योच उनाळा, त्योच पावसाळा!"

"पण माणसांचीं मनं बदललींत!"

"आर पर,–धोंडी हवालदार हाय ना अजून जिता! आन् जोशीबावा हाये—"

"तें झालं—"

"मंग कायबी काळजी करूं नगा. त्या रिशीनं का हुईना, दोन गडी तयार होत्यात गांवातले."

थोडा वेळ धोंडी थांबला. अन् मग हिवराच्या काटकीनं चिलीम साफ करीत भरल्या गळ्यानं बोलला,

"जोशीबावा, कोंडी आमच्या घरांतला येकलाच गडी! आमची आशा सपली—"

"संपली कशानं हवालदार? वय काय तुमचं?"

"असल चाळीसपन्नास—"

"अन् मग पन्नाशींत काय मुलं होत नाहींत का?"

"कशाला लटकी आशा लावताय् जोशीबावा? आपल्या नशिबातच न्हाई त्ये! कारभारीन धा वर्सांखालीं बोलली, पुन्ना लगीन करा—"

"मग करायचं होतंत—"

"का काय बोलनं का काय ह्ये! हवालदाराच्या घरान्यांत पहिली जिती असल्यावर दुसरी कुनी क्येली न्हाई! वाडवडील सर्गांतून थुकतील माज्या जिन्यावर—"

"हें कांहीं तरीच हवालदार तुमचं."

"म्हना! कायबी म्हना. माजं येड्याबागड्याचं ह्ये असलंच. तवा मी कारभारनीला बोललो, आइकलं का? कोंडी आपला ल्येक. त्यांनीं त्ये खरंच मानलं! तर आतां कोंडीला बोलतों मी – पर मनांत भ्या वाटतं!"

" कसलं ? "

" कारभारनीला वाइट वाटल ! "

जोशी धोंडीच्या पाठीवर थाप मारीत हंसत बोलला,

" वा ! हवालदार ! कुनाला खरं वाटेल का हें ? "

" आईच्यान् ! "

" पण कारभारणीशीं मऊ शब्दांत बोललेलं तर आम्हीं कधीं ऐकलं नाहीं तुम्हांला ! "

धोंडी लाजला, अन् बोलला,

" त्ये दावायचे दात जोशीबावा ! कुनाला सांगू नका ह्ये ! "

" नाहीं बा ! मी कशाला सांगतोय् ! उठतों आतां."

" थांबा, चार मुळ घेऊन जावा."

* * *

गांवच्या तालमींत किशा मेहनत करायचा. म्हणून मग गांवाशेजारीं वाडी होती, तिथल्या तालमींत कोंड्या जोर काढायचा. त्याच्या खिशांत खारका, खोबरं,—असलं खाणं असायचं. त्याच्या लोभानं वाडीचीं पोरं म्हणायचीं,

" कोंडी हवालदार, किशाची काय टाप लागली तुमच्या म्होरं उबं ऱ्हान्याची ! "

" त्याचे पितरबी ऱ्हायाचे ऱ्हाईत माज्या म्होरं;—अर पर वाइच दमछाकीला या की कुनी ! "

" ए शिरप्या, तूं लंगोट लावला हायेस,—उतर की आखाड्यांत—"

" छा ! आपल्याच्यानं ऱ्हाई व्हायाची हवालदाराची बरुबरी ! "

" कशी हुईल ? हवालदाराच्या दारांत म्हस बांधलीया."

" मंग ? तुमच्या दारांत ऱ्हाईत का म्हशी ? "

" हायेत की ! पर उपेग काय ? दुदाचा थेंब न् थेंब लोनावळ्याला जातोय्. पैका करायचा पघत्यात समदीं."

" अर पर मी घोळसायाचा ऱ्हाई; या कीं ! "

मग एखादं पोर भीत, बाचकत उतरायचं. कोंडी वजनानं भारी. तो अंगावर आल्याबरोबर त्या पोरानं जमीन धरावी. थोडी लोळाघुशी झाल्यावर मग त्यानं खालून आरडावं,

" छा ! हवालदाराची ताकत भलतीच ! पाक मुडदा पडला माजा ! "

कोंडीनं उठून त्याला मोकळं करावं. मग उगीच दंड फिरवावेत. पटांवर मनगटांचे रग्गे मारावेत. उगीच दोन पोरांचीं गचुंडीं धरून एकमेकांवर हापटावींत, अन् मग पवनेवर जाऊन तास न् तास विटकरीनं अंग घाशीत स्नान करावं. मूळचाच बांधीव अंगापेराचा कोंडी आतां अधिकच सरसा दिसायला लागला. वहिनीनं रोज रात्रीं त्याच्या अंगावरून मीठमिरची उतरून टाकावी.

यात्रा सताठ दिवसांवर आली. लक्ष्याचा जीव खालीं-वर व्हायला लागला. तो रोज लोकांच्या हजामती करतांना डोईला पाणी चोळीत म्हणे,

" माजं गाऱ्हानं समद्या गांवाम्होरं हाये. पहिली खोडी काई माज्या किशानं काडली न्हाई."

तेवढ्यांत डोक्याला कुठं तरी वस्तरा लागलेला गडी चिडून म्हणे,

" लक्ष्या, तुला कोणी फाशी देत न्हाई. थोरल हवालदार ध्येतील बघून."

मग पुन्हा सहाणेवर वस्तरा घाशीत लक्ष्या बारीक आवाजांत विचारी,

" तसं नव्ह तुका ! पर माज्यावर बोल नग ! व्हय ? धाकल्या हवालदाराची तयारी पाहिली का ? "

" न पघाया काय झालं ? त्योबी याच गांवचा, मीबी याच गांवचा."

" न्हव पर – किशाला भारी हाय, न्हाई त्यो ? "

साधा भोळा गांवकरी ' हो ' म्हणून जाई. पण एखादा बेरकी म्हणे,

" अर निसत्या तयारीनं काय हुतंय ? डाव यायला नगत ? तुझा किशा डावांत भारी पडनार ! "

आणि मग खूष होऊन लक्ष्या त्याचीं नखंत्रिखं जरा निचिंतपणं काढून अंग दाबून देई.

तो परोपरीनं आपल्या मनाचं समाधान करी. पण त्याला कांहीं धीर निघेना ! यात्रा दोनच दिवस उरली, अन् लक्ष्याच्या जिवाची घालमेल

व्हायला लागली. तो दोनचारदां धोंडी हवालदाराला शोधून आला; पण भेट कांहीं झाली नाहीं.

संध्याकाळीं किशा तालमींतून घरीं आला, जेवला, अन् बाहेर पडायला लागला, तों दारांत बाप आडवा झोंपलेला!

"का र बा? काय झालं?"

"काई न्हाई! पर तूं माज्या डोकश्यावर पाय देऊन जा."

"अर पर का?"

"न्हाई! तूं द्ये!"

किशा अवघडला. त्याला उमगलं, बापाचा कांहीं तरी डाव आहे. तो खालीं बसत म्हणाला,

"अर पर काय हाय तुझी विच्छा?"

तट्कन् उठून घोगऱ्या आवाजांत लक्ष्या म्हणाला,

"माझी विच्छा येकच हाय!"

"काय?"

"तूं ही कुस्ती खेळूं नगस!"

दृढ स्वरांत किशा बोलला,

"त्ये व्हायाचं न्हाई! मी मर्द हाय—"

"बरं, एक तरी करशील?"

"काय?"

"इत्ती कुस्ती तू खा राजा!"

किशा कांहीं बोलला नाहीं. पटकन् बापानं त्याच्या पायावर डोकं ठेवलं अन् तो बोलला,

"आर, आज इत्त्या पिळ्या हवालदाराचं आन खातों. थोरल हवालदार द्येवमानूस. माज्यासाटीं नव्ह, पर त्येंच्यासाटीं तरी इत्ती कुस्ती खा तूं. तूं कुस्ती खाल्लीस तर कुनी वाईट वंगाळ म्हनायचं न्हाई. पर जर धाकल्या हवालदारानं खाल्ली, तर समदा पट्टा म्हनल, – लक्ष्या न्हावी माजला! सगळा गांव थुकल माज्या तोंडावर! इत्ती माजी लाज राख—"

"अर बा—"

“ न्हाई पोरा ! इक्तं करच तूं. इत्तया कुस्त्या खेळलास. पांच-सात खाल्ल्यास बी. ही कुस्ती खान्यांत येस हाय. मारन्यांत अपेस हाय— आइक इक्तं ! ”

उदास होऊन किशा बोलला,

“ आइक, बा ! कुस्ती तर ही होनारच ! पर मी मपल्याकुन जोर करायचा न्हाई— ”

“ ठीव माज्या पायावर हात ! ”

किशानं बापाच्या पायावर हात ठेवला.

* * *

आज यात्रा. धोंडीबा कोंबडा आरवतांच उठला. बाहेर जाऊन आला, अन् मिश्रीनं दांत घाशीत बोलला,

“ आइकलं का, तुमच्या दिराला उटवा. मीं बलिवलंयू म्हनावं.”

कोंडी डोळे चोळीत आला. धोंडी म्हणाला,

“ आइकलं का कोंडीबा ! तुजा सबूद ग्येला, म्हनूनच म्यां कुस्ती आडिवली न्हाई. पर मनांत डाव धरून होता उपेगाची न्हाई. मी सवता पंच म्हनून उबा ऱ्हानार. हातबीत मोडाया लागलास तर तितंच हानीन. कुस्ती हा ख्योळ हाय. सरळी सरळी होऊं द्या. आलं ना ध्येनांत ? ”

“ व्हयू.”

“ आन् आजचा दीस घटकाभर शेताकड जाऊन या. मला पुंजा करायची हाय.”

थोड्या वेळानं जोशी दारीं ठाकला. बोलला,

“ हवालदार, लवकर आवरा. नाहीं तर जाऊन बसाल शेतांत कांद्यांना पाणी घालीत.”

“ नाहीं ! हा आलोंच पगा. व्हा तुमी म्होरं. आबिशेक— ”

सारजा आंतून डोकावली, अन् बोलली,

“ भावजी, थांबा वाइच.”

“ कां हो हवालदारीणबाई ! ”

“ न्हव, थोडं दूद— ”

" आतां दुधाचा आग्रह कशाला ? "

धोंडी बोलला,

" घ्या की जोशीबावा ! तुमचं नशीब लई जोरावर दिसतंय. आमाला कुनी म्हनीना ! "

" होय वहिनी ? "

दुधाचा पेला आणून ठेवीत सारजा बोलली,

" त्ये म्हशीचं दुद पेत न्हाईत."

" कां ? "

" धाकल्यासाठीं न्हाऊं घ्ये म्हंत्यात. गाय यील तवा त्यांचं दुद सुरू व्हायाचं."

" कोणती व्यायच्यै ? मोरी ? "

" न्हाई, मोरी मेली. लई औशेद यांनीं केलं; पर तिचं आनपानीच सरलं ! "

" अन् मग ? "

" तिचीच कालवड हाय कुशी. दुसरं येत."

" केव्हां विणार ? "

" आली आठ धा दिसांवर."

" चीक पाठवा बरं का ! नाहीं तर विसराल."

धोंडीनं भलावण केली,

" त्या न्हाई विसरायच्या. गाय याली का आलीच मला वडगावची खेप ! "

गदागदा हांसत जोशी उठला.

वाघोबाचं देऊळ बसकंच होतं. समोर रस्त्यापलीकडे दीपमाळ. वाघोबा म्हणजे भैरव. जागतं दैवत. कुणाला पान लागलं — तर त्याला वाघोबासमोर निंबाच्या पाल्यांत जागता ठेवीत. पान उतरलंच पाहिजे.

जोशी देवळांत आला. त्यानं अभिषेकाची गाडी भरधांव सोडली. तो आटोपेस्तोंवर धोंडी अन् सारजा आलीं. धोंडीनं उपरणं पांघुरलं होतं. हातांत तरवार होती. सारजा ठेवणींतलं पाटाव नेसली होती, अन् तिनं भली झुपकेदार नथ घातली होती.

जोशानं थट्टा केली,

" अगोदर बामणाला नमस्कार करतां का ? आशीर्वाद दील बामण."

" कवाबी करायचाच हाय. आगुदर काय अन् मागून काय."

दोघांनीं नमस्कार केला. जोशी बोलला,

" दिला बरं का आशीर्वाद ! "

" कंचा धिला ? "

" पाळणा हालूं दे म्हणून."

सारजा उदास झाली. धोंडी बोलला,

" जोशीबावा, आतां पाळणा हालायचा कोंडीच्या दारीं. आवरा पुजा."

जोशानं पूजा सांगितली. धोंडीनं वाघोबाला तरवारीच्या टोकानं तांबडं गंध लावलं. आरती झाली, अन् मग गांवाच्या पूजा यायला लागल्या.

दुपारीं देवासमोरच्या रस्त्यावर हलवायाचीं दुकानं बसलीं. देवीसिंगाची बाईलहि आपलं आरसे–फण्यांचं दुकान घालून बसली. पोरं उगीचच हलवायाच्या दुकानांसमोर कालवा करायला लागलीं. कुणी पोरगं दोन पैशांच्या रेवड्या घेऊन दिमाखानं खात हिंडायला लागलं – बाकी पोरांना अंगठा दाखवीत.

सांजच्या प्रहरीं पांढरीच्या शेतांस मांगाची हलगी घुमायला लागली.

गांवांत किशा अन् कोंड्याच्या कुस्तीवर भरपूर चर्चा झाली होती. पैजाहि लागल्या होत्या. भंवतालचे कुस्तीगीर गडीहि ही गंमत पाहण्यासाठीं मोटे उत्सुक होते. हलगी सुरू होतांच तिच्याभोंवतीं माणसांचं रिंगण पडलं. गांवांतले एक-दोन गडी उगीचच धोतराच्या शेमल्यानं पोरांना ' मागं व्हा ' म्हणत हाणायला लागले.

थोडक्या वेळांत धोंडी हवालदार, भुजा माळी, केरबा हाटकर, पवनें-पलीकडच्या शिनवलीचा गणू ढमाला, हुसन्या शिकलगार,–अशी जाणती मंडळी फडांत उतरली. दर वर्षी पंचांचं काम गणू ढमाला अन् केरबा हाटकर करायचे. केरबाच्या हातांत यंदाहि इनाम वांटण्यासाठीं पागोट्यांचं गठुळं होतं.

धोंडीनं हलगी थांबवली. पुढं होऊन तो बोलला,

" आर त्यो किशा कुटं हाय ? "

पोरं आरडलीं,

" येतुया ! "

" आर पर कवा ? लई गामागुंगा नग होऊंस म्हनावं."

दोन-चार पोरं किशाला बोलवायला पळालीं. तो वाटेंतच भेटला. मलमलीची पैरण घातलेला अन् गालाला काजळ लावलेला कोंडीहि येऊन थडकला. धोंडीनं दोन्ही गड्यांना जवळ घेतलं, अन् फडामध्यें उभा राहून तो बोलला,

" ऐका मंडळी. समद्यांत शेवटीं या माज्या दोगा लेकरांची कुस्ती हुईल. कुस्तीच्या फडांत ह्यो किशा न्हावी न्हाई, अन् कोंडीबा मऱ्हाटा न्हाई.-पैलवानाची जात येकच; पैलवान.-तवा दोगांनींबी मोकळ्या मनानं खेळायचं—"

शिकलगार ओरडला,

" हवालदार, कुस्ती चितपट झाली पायजे ! "

" व्हय व्हय ! बरं माज्या पुतांनो, कुस्ती मर्दाचा ख्येळ हाय. मर्दावानी खेळा. चीतपट हुईस्तवर सोडायची न्हाई कुस्ती."

आरंभीं बारकींसारकीं पोरं हुंदरलीं. मग दोन-चार भारी गड्यांच्या कुस्त्या झाल्या. लक्ष्याचं चित्त अस्थिर होतं. त्यानं किशाला एका अंगाला नेऊन त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलं. मान हालवीत किशा परतला.

मग शेवटली कुस्ती. दोघांनींहि लंगोट लावले. जांघ्ये कसले. धोतरं बाजूला फेंकलीं. धोंडीच्या पायांना हात लावले. धोंडीनं दोघांच्याहि पाठीवर हात ठेवले.

गडी रंगणांत आले. किशा सडसडीत पण गाठी बांधलेला. कोंडी गोरा पान, देखणा, अंगानं किशापेक्षां दिढीचा. दोघांनीं माती उचलून एकमेकांना मुजरा केला.

हलगी जोरजोरानं वाजायला लागली. सगळे श्वास कोंडून बघायला लागले. काय होतंय् ! काय होतंय् !

पण किशा मोहोरा घेईना. नुसता कोंडीचे तडाखे चुकवायचा. एकदां खालीं येतां येतां सांवरला, अन् पुनः घुम्यासारखा उभा !

हुसन्या ओरडला,

" हवालदार, ही कुस्ती न्हाई ! "

" न्हाई न्हाई ! "

धोंडी बोलला,

" तसं कां र किशा ? आर भिऊं नगस ! मी हाय तुझ्यामागं उबा ! "

किशा पुढं होऊन डाव काढणार, इतक्यांत कोंडी त्याच्या अंगावर जाऊन कोसळला.—एखादा कडा कोसळावा तसा. किशा तेवढ्यांत चपळाईनं जमिनीला धरून राहिला म्हणून; नाहीं तर चीतच व्हायचा. कोंडी त्याच्या पाठीवर बसला, अन् त्यानं शड्डू ठोकला.

धोंडी ओरडला,

" तसं करायचं न्हाई ! कुस्ती पुरी होऊं द्ये ! "

धोंडीचं ऐकून मंडळींनीहि गलगा केला. तेव्हां मग किशाला उठूं न देतां कोंडीनं त्याच्यावर स्वारी भरली.

झालं ! हलगी थांबली. मंडळींनीं कडं मोडलं, अन् त्या दोघांभोंवतीं घोळका केला. आरडा व्हायला लागला. कांहीं परगांवचे पैलवान होते. ते तार स्वरानं म्हणाले,

" ह्यो काई खरा खरा डाव न्हाई ! "

" न्हाई तर काय ? मोटामाटाल ऽ पैलवान सवारी भरीत्यात. "

" ह्यो मर्दाचा ख्येळ न्हाई ! "

" अर चल मर्दाच्या— "

" एः ! लई तोंड चाललय् ? काडूं का बत्तिशी भाएर ? "

" अर जा काडनाऱ्या— "

धोंडी हात उंचावून ओरडला,

" आर हाय काय ह्ये ? मी जिता हाय की अजून ! व्हा, मागं व्हा. सरा मागं. ए सोपान्या ! "

मग दोघां-चौघांनीं रेटारेटी करून पुन: मैदान मोकळं केलं. धोंडीनं गणू ढमाल्याला सांगितलं,

" वस्ताद, तुमी सांगा, ह्यो डाव हाय का न्हाई— "

गणू त्या दोघांजवळ जाऊन बसला. त्यानं पाहाणी केली, अन् निकाल दिला,

"बरुबर हाय डाव."

झालं ! कोंडी फुरफुरला, अन् त्यानं किशाच्या नाकावर एक घिस्सा मारला. किशाच्या नाकांतून रक्त वहायला लागलं.

तिरीमिरीसरशी धोंडी उठला, अन् त्यानं कोंड्याच्या पाठींत एक कणका घातला. बोलला,

"पोरा, नामरदपना नग करूस असा ! हवालदाराचा बच्चा हायेस !"

हुसन्या आरडला,

"हवालदार, वैसा क्यूं ? घिस्सा बी डाव हाय कुस्तींतला !"

"असा जीवघेना डाव ? मला नग ती कुस्ती."

"नहीं हवालदार ! चीतपट झाली पायजे !"

दोघेहि जोरजोरानं उसासे टाकीत होते. किशा पार चेपल्यासारखा दिसत होता. तोंच त्याचा बाप गागला,

"न्हाई हवालदार ! चीतपट होऊं द्या ! माजा पोरगा म्येला तरी चालल !"

अन् काय जादू झाली कोण जाणे ! किशानं कोंडीच्या पकडींतून हात सोडवून नाक पुसलं. मग तो जो दसरंगावर उठला, – तो धोबीपछाड डाव करून त्यानं कोंड्याला सपशेल चीत ठेवून दिला !

क्षणभर कुणाला कांहीं बोलायला सुचलं नाहीं. पण दुसऱ्या क्षणीं धोंडी हवालदार किशाकडे धांवला, अन् त्याला वर उचलून ओरडला,

"भल रे माज्या पुता ! खूप क्येली कुस्ती !"

किशानं आपल्याला धोंडीच्या मिठींतून सोडवून घेतलं, अन् त्याच्या पायावर डोकं ठेवून तो ढसढसा रडायला लागला. धोंडीनं पुसलं,

"कां र ? अर रडाया का झालं ?"

त्यानं किशाला उठवून छातीशीं धरलं. तसा तो अधिकच हुंदके द्यायला लागला. धोंडी त्याच्या पाठीवरून हात फिरवून बोलला,

" येडा ! रडायचं कशापाई ? कोंडी हाय दिडीचा गडी,–पण त्वाबी असा फक्कड डाव क्येला ! लक्ष्या, धोतर न्येसवा पोराला, अन् मिरवत घरीं न्या ! "

" नग ! मला न्हाई मिरवायचं."

" कां र येड्या ? "

" न्हाई ! "

किशानं आपलं धोतर अन् अंगरखा उचलला, अन् फडांतून चालता झाला.

अन् कोंड्या ? त्याच्या तोंडाला खंडीभर काजळी फासली जणूं. पाठीला माती लागल्याचं त्याला कांहीं वेळ कळलंच नाहीं. लहानपणीं त्यानं पोरां-सोरांबरोबर कुस्त्या मारल्या होत्या. सगळेच गडी तसल्या झोंबाझोंब्या खेळत. पण ती कांहीं डावाची कुस्ती नव्हे. नुसती अंगघुसळणी. त्यांत कोंडी हवालदाराचा भाऊ. त्याला कोण चीत करणार !

फडांतली अशी ही त्याची पहिलीच कुस्ती. अन् ती त्यानं खाल्ली ! थूः ! यापरीस तो मेला कां नाहीं ? महाराचा मोकिंदा ठेंच लागली अन् मेला. तसं कां झालं नाहीं ? सगळ्या हवालदारांच्या कीर्तीला त्यानं काजळी पोतली ! आतां लोक काय म्हणतील ? ते थुंकतील तोंडावर ! मारे डौलानं किशाला आव्हान दिलं. म्हैस आणली–दादा नको म्हणत होता तरी. बदाम, खारीक, खोबरं—थूः !

बराच वेळ तो मान खालीं घालून बसून राहिला. शेवटीं पोरं गोळा झालीं. एकानं त्याचं धोतर आणलं. एकानं पैरण शोधली. कसाबसा कोंड्या उठला. तोंडांत गेलेली माती त्यानं थुकून टाकली. मनगटाला ओंठ पुसले, अन् मग धोतर कसंबसं गुंडाळून निघाला.

कुठं जायचं ?—कुठं ?

वहिनीकडे ! दुसरीकडे कुठं ? हें काळं तोंड लपवायला तीच एक जागा.

सारजा दारांत उभी होती. तिच्यापर्यंत बातमी केव्हांच पोंचली. ती चिंता करीत होती, काळंजून गेली होती. आतां भावजी येतात कीं नाहीं कोण जाणे !

पण कोंडी दिसला तसा तिचा जीव भांड्यांत पडला. खालच्या मानेनं

कोंडी पायऱ्या चढून घरांत शिरला. सारजानं त्याला धरून बैठकीवर नेलं. तिथं जातांच त्यानं तिच्या कुशींत तोंड खुपसलं, अन् तो मुसमुसून रडूं लागला. तें पाहून बरोबर आलेल्या पोरांनीं काढता पाय घेतला.

सारजा मोठी शहाणी बाई. ती कांहीं बोलली नाहीं. नुसती पाठीवर हात फिरवीत बसली. थोड्या वेळानं हुंदके जरा कमी झाले. तेव्हां तिनं हांक मारली,

" भावजी ! "

पण कोंडीला तेवढं पुरलं. पुनः तो तिच्या कुशींत तोंड घाशीत रडूं लागला. सारजेचेहि डोळे पाणावले. पण मोठ्या ताकतीनं स्वर ताब्यांत ठेवून ती बोलली,

" भावजी ! "

" व्हयनी, मला ईख द्ये ! "

" कशाला ? "

" खायाला. ईख खातों, अन् झोपून ऱ्हातों. मातर येक कर—"

" काय ? "

" हितून उठूं नगस. अशी बसून ऱ्हा ! "

तशा वेळींहि सारजेला हंसूं आलं. तें दाबीत ती बोलली,

" ईख आनायाबी नग उठूं ? "

" नग."

" बयागय ! अन् मंग ईख कोन आनील ? "

" कुनीबी आनील. किसन्याला सांग."

" कंचं ईख सांगूं ? अफू का मोरचूद ? "

" अफू नग—"

" कां व ? "

" ती खायाला कसनुशी लागती—"

सारजाला हंसूं आवरेना. ती कोंडीचं तोंड उचलीत म्हणाली,

" बगूं तोंड ईख खानाराचं ? "

कोंडीनं पुनः तोंड कुशींत खुपसलं, अन् म्हणाला,

" मर जा तकड ! "

" मंग सोडा कीं ! तुमीं तर धरून ठिवलंय् अन् मंग मरूं कशी ? "

" न्हाई सोडायचा."

" बरं. घरीं येतील आतां. दिवा लावीत्यें."

" नग लाऊंस दिवा."

" मंग ? असंच अंदारांत न्हायाचं ? "

" व्हय्. म्हंजी दादाला त्वांड न्हाई दिसायचं."

" पर उद्यां ? दीस निगाल्यावर ? "

" मी भायेर निगायचा न्हाई."

" अन् मन आंगुळपांगुळ ? "

" तीबी करायचा न्हाई."

" किती दीस ? "

" मला न्हाई ठाव ! तूं लई वाईट बायकू हायेस ! "

" मग सोडा कीं ! धरून कशाला ठेवली ? "

" न्हाई—"

तेवढ्यांत बाहेर धोंडीचीं पायतणं वाजलीं. कोंड्या पटकन् उठला, अन् कोठीच्या खोलींत पळाला. धोंडी अन् जोशी आंत आले. सारजा आंत जाऊं लागली.

धोंडीनं विचारलं,

" दिवा न्हाई लावायचा का ? "

" लावीत्यें."

" या जोशीबावा."

दोघे बैठकीवर बसले. सारजा दिवली घेऊन आली, अन् ठाणवईवर ठेवून ती आंत निघाली. धोंडी बोलला,

" भावोजी न्हाई आल वाटतं ? "

सारजा जातां जातां बोलली,

" आलऽ—"

जोशी वळकटीला टेकला. सुस्कारा सोडीत बोलला,

" हवालदार, हें बरं नाहीं झालं."

उसळून धोंडीनं विचारलं,

" काय ? "

" हेंच—न्हाव्याच्या पोरानं—"

" झालं ? जोशीबावा, तुमीबी ह्येच म्हन्नार ? "

" माझ्या म्हणण्यानं काय होतंय् ? जग म्हणणार—"

" काय म्हन्नार ? "

" कीं हवालदाराची आबरू गेली ! "

क्षणभर धोंडीनं विचार केला, आणि तेवढ्याच जोरानं उत्तर दिलं,

" येडे असतील ते आसं म्हंतील. पर शाहाने—"

" काय म्हणतील शहाणे ? "

" ते म्हंतील, कीं हवालदाराची आबरू उजळून निंगाली ! "

" ती कशी काय ? "

" येड्यावानी काय करताय् जोशीबावा ! मीबी मानुसच हाय. किशानं ज्याला चीत केलं, त्यो माजा सक्का धाकटा भाऊ ! माजं ल्येकरू त्ये ! खिनभर मलाबी वाईट वाटलं. पर—"

" पण किशाला तुम्हींच उचललंत ना ? "

सारजा आंतल्या बाजूला उभी राहून बोलणं ऐकत होती. तिनं श्वास रोखून धरला.

धोंडी गौरवानं बोलला,

" व्हय ! खिनभर वाईट वाटलं,—त्ये धोंडी ढमाल्याला. पर दुसऱ्या खिनाला धोंडींतला हवालदार जागा झाला ! त्यो धोंडीला म्हंगाला—"

" काय ? "

" त्यो म्हंगाला, मर्दा, तू या पट्ट्यांतला हवालदार. तुजं घरानं थोरा-मोठ्याचं. हीं दोनी लेकरं तुजींच हायेत. कुनी का कुस्ती मारीना, तुज्याच लेकरानं मारली ! चाल, उचेल त्याला ! उचेल ! न्हाई उचेललंस तर मातर तुजी हवालदारी ग्येली मातींत ! "

" मग ? "

" मंग काय ! आसुडाचा फटका खाल्ला धोंडीनं ! समदं आंग शिराशिरलं, अन् धावत जाऊन उचललं किशाला ! आतां समजलं ? "

" हवालदार, तुमचं सारं वागणंच वेगळं—"

" पर हवालदारीला सोबून हाय का न्हाई त्ये तुमी सांगा ! "

" आम्हीं काय सांगायचं ? "

" मंग कुनी ? आरज्या मांगानं ? त्ये नव्ह जोशीबावा ! श्याहान्या मानसांनीं बरं म्हनाया होवं — बोला."

जोशी श्वास उभावून बोलला,

" हवालदार, तुमच्या पायाशींहि बसायची लायकी नाहीं आमची ! तुम्ही सत्ययुगांतलीं माणसं. कशाला आलां या आमच्या कलियुगांत ? तुमच्या हातून चूक घडायचीच नाहीं. जें वागाल,—तें निख्खळ सोनं— शंभर नंबरी सोनं."

धोंडीनं पटकन् जोश्याचे पाय धरले. ते सोडवीत जोशी बोलला,

" बामण आहें मी. पाया पडलं कीं आशीर्वाद दिला पाहिजे. काय देऊं तें सांगा."

" असा द्या आशिर्वाद — का जलमभर वाडवडिलांच्या बान्याला कलंक लागल असं काईबी घडायचं न्हाई मपल्या हातून ! "

" दिला."

आंत सारजाच्या डोळ्यांतून गंगा वहात होती. कधीं यायची नाहीं ती या पाळीला बाहेर येऊन तिनं जोश्याच्या पायांवर डोकं ठेवलं. जोशी बोलला,

" अरे हें मांडलं आहे काय तुम्हीं ? "

सारजा भरल्या गळ्यानं बोलली,

" भावजी, त्यान्ला धिला आशिरवाद ! मला न्हाई दिला."

" काय देऊं, बोला.—"

" असा द्या, का असा भरतार जल्मोजल्मीं लाभावा ! आन् यांच्या नायाची चाकरी करीत जलम संपावा ! "

" दिला."

सारजा उठली. क्षणभर घुटमळली. दुसऱ्या क्षणीं तिनं धोंडीला नमस्कार केला अन् ती आंत पळाली. धोंडी हांसत बोलला,

"हाय का जोशीबावा ! कसला हा येडेपना !"

"हवालदार, अशीं दहावीस वेडीं जोडपीं जन्माला आलीं तर जग उद्धरून जाईल. चलतों मी—"

"पर काई खानंपिनं—"

"करून ठेवलंय् मी."

जोशी बाहेर पडला. धोंडी आंत गेला. पाय धुवून तो स्वयंपाकघरांत डोकावला. सारजा त्याचं एकऱ्याचं पान मांडीत होती. तो आंत येत बोलला,

"ह्ये काय ? माजं येकल्याचं पान ? आन रावसाब कुटं हायेत ?"

"त्ये जेवतील माज्यासंगट."

"न्हाई तर उपाशी ऱ्हाईल.—"

"न्हाई ऱ्हायाचे."

धोंडीचं जेवण आटपलं. उष्टं काढून सारजा कोठीच्या खोलींत गेली. दिवलीच्या प्रकाशांत तिनं पाहिलं. कोंडी कुणग्यांच्या मध्यें तोंड खुपसून आडवा तिडवा डोळे मिटून पडला होता. सारजानं हलक्या स्वरांत हांक मारली,

"भावजी !"

कोंडीनं डोळे घट्ट मिटून घेतले. सारजा त्याच्या जवळ येऊन त्याला हालवीत म्हणाली,

"भावजी, चला जेवाया."

"मला न्हाई ज्येवायचं !"

"खरं का काय ! दिवसाबी न्हाई जेवन झालं—आज जत्रेचा दीस—चला."

"न्हाई व्हयनी—"

"उटा म्हंत्यें ना !"

"न्हाई."

सारजा त्याला आपल्या कुशींत ओढून म्हणाली,

" असं न्हाई करूं येड्यावानी. लई कामं पडलींत मार्जी. येसकरनीला वाढून द्यायचं हाय सनाचं. भराडीन, गुरव—चला."

तिच्या कुशींतून उठून पुनः कुणगीच्या कोपऱ्यांत तोंड खुपशीत कोंडी बोलला,

" न्हाई—न्हाई—न्हाई ! "

" असं ? अस ह्ये कवापत्तुर वैराग घ्येनार ? "

" लई दिसापत्तुर."

" उंद्यावी न्हाई ज्येवनार ? "

" न्हाई."

" परवावी ? "

" न्हाई."

" तेरवावी ? "

" कवावी न्हाई ज्येवनार ! तू जा हितून."

सारजा उठली. निघतां निघतां ती म्हणाली,

" न्हावा उपाशी. तुमी न्हाई जेवनार, तर मीवी न्हाई जेवनार ! वाढनं वाढीत्यें, आन् समदं आन्न ठिवत्ये म्हशीच्या म्होरं ! मंग मातर येऊं नगा कंदीबी भूक लागली म्हनून—"

स्वयंपाकघरांत तिनं वाढपं वाढलीं, अन् बाकीचं झाकून ठेवायला लागली. तों दारांत कोंडीचं धुसफुसणं तिला ऐकूं आलं. त्याच्याकडे न पाहतां ती म्हणाली,

" मला न्हाई येळ तुमासंगट खेळत बसाया—"

कोंडी आंत येऊन धप्प्दिशीं पाटावर बसला, अन् बोलला,

" मंग दादानं कां उचेललं किशाला ? "

समजावणीच्या स्वरांत सारजा बोलली,

" त्ये इकत्यांत तुमाला न्हाई कळायचं भावजी."

" आतां उंद्या वाडीचे सगळे गडी मला हासतील—"

" हासतील त्यांचे दात दिसतील. तुमी जाऊन त्यान्ला सांगा, थोरल्या

हवालदाराच्या पायाचा अंगारा न्येऊन लावा म्हनावं! आडलेल्या बाईचीबी सुटका व्हईल त्यानं! द्येवमानसायेखीं असं बोलूं न्हाई—"

"भर्जी क्येलीं नसशीलच—"

"क्येलीं—क्येलीं! उटा मुकाट्यानं. पाय धुऊन या."

कोंडी पाय धुवून आला. त्याला वाढीत सारजा बोलली,

"आतां कसं श्यान्यावानी केलं माज्या लेकरानं! अव, कुस्ती हा ख्येळ हाय. त्यात हारजीत व्हायाचीच—"

"आता न्हाई मी कंदीबी कुस्ती खेळायचा."

"का व?"

"नग!"

"मंग म्येहनत? का तीबी सोडून द्यायाची?"

"व्हय."

"आन् दुद—"

"दुदबी बंद. म्हस टाक इकून."

"बयागय! खरं का काय ह्ये!"

"माज्या गळ्याच्यान्!"

* * *

कोंडीनं शपथ खाल्ली खरी. पण—घडलं तें तिसरंच.

दुसऱ्या दिवशीं तो बराच उशीरा उठला. सारजा म्हणाली,

"भावजी, आतां बिगी बिगी हाततोंड धुवून भाकर खा, आन् श्येताकड जा!"

"कशाला?'

"नागलीचं श्यात भाजायचं हाय—"

"मी न्हाई जायाचा."

"का व?"

"मला न्हाई गोड लागत श्येतकाम."

"मंग काय गोड लागतं?"

" काई न्हाई."

तो घरांतून बाहेर पडला, अन् नीट पवनेवर गेला. तिथं बाया हंडे घाशीत होत्या, अन् पोरं डुंबत होतीं. तीं सगळीं त्याच्याकडे निरखून दांत काढूं लागलीं. कसंसंच वाटून कोंडीनं तिथून निघून पळ काढला.

किल्ल्याची एक सोंड पार पवनेला जाऊन भिडली होती. तिथं नदीच्या कांठीं पिंपरीची गर्द सांवली होती. खालीं डोह होता. कोंडी तिथं जाऊन पोंचला, अन् त्या सांवलींत हात डोक्याखालीं घेऊन पसरला.

स्थिर पाण्यांत किल्ल्याच्या पडक्या तटाचं प्रतिबिंब पडलेलं होतं. मधूनच तीन बगळे पायांचं सुकाणूं करून पकापका पंख हालवीत या अंगाचे त्या अंगाला गेले. तेंहि त्या आरशांत दिसलं. पलीकडील तीरावर एका कण्हेरीच्या फांदीला तांबडा फुलांचा झुबका हिंदोळत होता. त्याचीहि पडसावली पाण्यांत दिसत होती.

पण कोंडीचं लक्ष तिसरीकडेच होतं. त्याला वाटलं,

किशाचा खून करावा ! लक्ष्याच्या लांब नाकाडावर कुऱ्हाडीचा दांडा हाणावा. आरज्या मांगाची हलगी फोडून त्याला गांवांतून हाकून द्यावं. कालच्या सगळ्या पैलवानांच्या डोईवर हा तुंगीगड उचलून ठेवावा.—अन् त्यांना पार मुंबईपर्यंत पळवावं. हुसन्या शिकलगाराच्या बत्त्या फोडून टाकाव्या. ह्या पिंपरीची छानशी काठी तोडावी, अन् सगळ्या पोरांच्या पाठी सडकून काढाव्या—!

अन् मग दादा—

दादाची आठवण होतांच तो दचकला.

दादा खरोखरीच मोठा माणूस असला पाहिजे. कारण वहिनी त्याला देवमाणूस म्हणते—

पण वहिनी फार वाईट बाई आहे. तिचा एक दांत पडला आहे. रात्रींची ती जोरजोरानं घोरते. लहानपणीं झाडावरून पडून तिचं एक बोट वांकडं झालं आहे—

छेः ! वहिनी फार चांगली बाई आहे. त्याला वहिनीशिवाय दुसरं

कुणीहि आवडत नाहीं. अन् वहिनी दादाला चांगलं म्हणते. तो चांगला असलाच पाहिजे—

पण हें कांहीं चांगलं झालं नाहीं—

कोंडी पालथा होऊन झोपून राहिला.

* * *

दहा एकर म्हणजे एकच सलग तुकडा नव्हता.

तुंगीगडावर झुंझारमाची आहे, त्या अंगापासून डोंगराची एक सोंड पवनेपावेतों उतरली आहे. त्या सोंडेच्या बाजूला झाडीनं गच्च भरलेलं एक लवण आहे. तें लवण आणि सोंड हें गुरचराईचं रान सगळं हवालदाराचं.

मावळांतले झाडीनं झांकलेले डोंगर कोळशाच्या लोभानं मावळ्यांनीं पार बोडके केले. हातीं काय राहिलं तें देवाला माहीत. डोंगर उजाड झाले, अन् हात काळे.

पण हवालदारानं कांहीं आपल्या रानांतल्या एका झुडपालाहि हात लावला नाहीं. तो म्हणाला,

"वाडवडिलांची धन हाय ती. मपल्या हातून न्हाई व्हायाचं ह्ये पाप."

लवण धोंडीनं शाबूत राखलं, अन् सोंडेच्या अर्ध्या भागांत नागलीसाठीं रान काढलं. झाडं तोडलीं नाहींत. भुजाबानं विचारलं, तर धोंडीनं सांगितलं,

"भुजाबा, झाडं तोडलीं का,—म्हंजी जिमीन समदी व्हाऊन जाती."

"पर समदं जग तोडीतं—"

"जग श्याहानं ! मी येडा !—झालं ?"

"तसं कसं ? पर—"

"पर असत्यात कोमडीला. भुजाबा, अशी कितीक नागली लागती आपल्याला ? कारबारनीला नागलीची भाकर लई आवडती, म्हून लावायचीं कवळाभर रोपटीं. ज्यास्ती पिकवून खानार कोन ?"

त्या नागलीच्या तुकड्यापासून उतरते दहा एकर सुरू होत, ते पार पवनेपर्यंत. मधल्या एका चोंढ्यांत एका अंगाला धोंडी भाताचं रोप करायचा, दुसऱ्या अंगाला नागलीचं. आज सकाळपासून त्यानं किसन्याला गुरं घेऊन सोंडेवर काढून दिलं होतं. तो भाजणीच्या चोंढ्यांत गचपण गोळा करीत होता. न्याहारीचा वेळ टळून गेला, अजून सारजा आली नव्हती.

तो बांधावर बसला, अन् चिलीम पेटवून धूर काढीत राहिला. खालीं त्याची जमीन पसरली होती, तिच्याकडे त्यानं पाहिलं; अन् मग त्याला वाटलं, जोशी म्हणाला तें खरं आहे. आपल्या जमिनीसारखी कसलेली जमीन शेजारीं कुठं दिसत नाहीं.

अभिमानानं त्याची छाती उंचावली. त्यानं वीराला अन् गडावरल्या महादेवाला नमस्कार केला, अन् पुटपुटला,

" यांत माजं काय बी न्हाय. समदी तुमा दोगांची कुरपा हाये."

तोंच सारजा लगबगीनं येत असलेली त्यानं पाहिली. तट्कन् उठून त्यानं हळी दिली,

" आज उशीर क्येला लई ? "

सारजा थोडी भेदरली होती. ती बोलली,

" इत्ता दीस वर आला, भावजी सकाळधरून कुठं ग्येलऽत्ये घरीं आलच न्हाईत."

" न्हाई आला ? "

" न्हाई ! काई खानं न्हाई, पिनं न्हाई—"

" असल हितंच कुटं तरी."

" पर म्या भुजाबाच्या सर्ज्याला दवडलं चहुकड—"

" मंग न्हाई गावला का खुटं ? "

" न्हाई."

" असूं द्या. ह्ये यवढं काम उरकल्यावर मी सवता पघतों त्याला."

त्याला न्याहारी वाढीत सारजा बोलली,

" वाटंत लक्षिमना न्हावी भ्येटला."

" का म्हंगाला ? "

" पोराला ममईला लाऊन आला म्हन इरवाळींच—"

" आसं ? "

" व्हय. समद्यांला सांगत हुता, जळांत न्हायाचं अन् मगरीशीं वैर धरायचं, तसं कशापाई ? "

कांहीं वेळपर्यंत धोंडी भाकर खात राहिला. मग श्वास सोडून म्हणाला,

" काई खरं व्हायलं न्हाई ! आपुन कवा गांवाला मगरीचीं नखं दावलीं होतीं ? "

सारजानं उत्तर दिलं नाहीं. पाण्याचा तांब्या तोंडाशीं नेत धोंडी बोलला,

" कुनी कायबी म्हनीना का ! आपुन धर्माचा रस्ता सोडायचा न्हाई. तुमी जावा. मी येतों कोंड्याला बगून. आसल वाडींबिडींत जाऊन बसला."

सारजा घरीं परतली. धोंडीनं किसनाला हळी देऊन दुपारीं गुरं पाण्यावर आणायला सांगितलं. हातचं काम आवरून तो तसाच वाडीकडे निघाला.

वाडींत या वेळीं बहुधा कोणी बाप्या सापडायचा नाहीं. सगळे लोणावळ्याला दुधं घेऊन जात. दिवसभर म्हशीचं शेणपाणी बायकाच करीत.

धोंडीला वाडींत शिरतांना पाहिलं, तशा तरण्याताठ्या सुना डोईवरचे पदर मर्यादेनं सरसे करीत पटकन् घरांतून शिरल्या, अन् म्हाताऱ्यांना म्हणाल्या,

" बयागय ! थोरल हवालदार अल्याती."

धोंडी तालमीजवळ उभा राहिला. शेजारून एक नागवं पोर धाकट्या बहिणीचा हात धरून चाललं होतं. त्याला धोंडीनं पुसलं,

" ए बाळा ! "

बाळ नाक फुरकावीत टुकटुक त्याच्या तोंडाकडे पहात उभं राहिलं.

" आर, आमचा कोंडी दिसला का कुटं ? "

एका झापाच्या झोंपडींतून एक म्हातारी बाहेर आली, अन कौतुकानं बोलली,

" हिकडं कुनीकड सोन्याचा दीस उगवला आज ? "

" आत्याबाय, आमचा कोंडी दिसला का कुटं ? "

" न्हाई बा ! मी कवाची हितंच हाय. व्हय हवालदार ? काल कुस्तींत म्हन—"

" व्हयू व्हयू."

" म्हंजी आइकलं त्ये खरंच म्हनायचं ! "

" व्हयू."

" काई जगांत न्याव व्हायला न्हाई—"

" न व्हाऊं द्या. पर आमच्या ह्या पोराचा कुटं पत्त्या—"

" पगा पगा हवालदार ! लई मानाचं हाय तुमचं पोर. एखाद्या वख्ती–"
" काय ? "
" नव्ह, जीव द्यायाबी मागं म्होरं पाह्याचं न्हाई त्ये ! मी सांगून ठेवीत्ये–"
चर्रकन् धोंडीचं मन जणूं कुणीं भाजून काढलं. तो गडबडींत बोलला,
" न्हाई आत्याबाय, त्यो तसं न्हाई करायचा ! "
" काई सांगूं नका ! ही अल्कडचीं पोरं लई भुरी घालीत्यात डोक्शांत."
धोंडी अत्यंत अस्वस्थ झाला. वाडींत जेव्हां कुणीच कोंडीला पाहिल्याचं सांगेना, तेव्हां तो घाईघाईनं पवनेवर आला. पिंपरीच्या डोहापाशीं आल्याबरोबर त्यानं कपडे काढून कांठावर ठेवले, आणि पाण्यांत उतरून सारा डोह धुंडाळला.

त्याचं मन सारखं त्याला खात होतं. हें चांगलं झालं नाहीं ! आपण किशाला उचलायला नको होतं. तेंच पोराला फार लागलं असावं. किती झालं तरी तो धाकटा भाऊ. आईबापावेगळा. एवढे दिवस तळहातावरल्या फोडासारखा वागवलेला. दुखलं खुपलं पाहिलेलं. त्याच्याशिवाय हवालदाराच्या घराण्यांत दुसरा तंतू नाहीं. नव्हे नव्हे—

अन् हातीं काय आलं ? शेवटीं लक्ष्या म्हणालाच कीं नाहीं ? पाण्यांत राहून मगरीशीं वैर !–या लक्ष्यासाठीं आपण काय काय केलं. एकदां गांजा सांपडला त्याच्या घरीं,–पोलिस धरून नेत होते. आपण नाना परी करून त्याला सोडवलं ! अन् तो आपल्याला मगर म्हणाला—

नव्हे ! प्रतिष्ठाहि नासली ! पोरगंहि गमावलं—

धोंडीला एकदम हुंदका आला. तो डोह शोधतां शोधतांच मुसमुसून रडूं लागला. नको म्हणायलाहि कोणी नव्हतं.

वर ऊन्ह चटाचटा तापत होतं, अन् खालीं ही मनांतली आग. पाण्यांत असूनसुद्धां धोंडी दोन्हीकडून भाजून निघत होता.

अचानक एक भला मोठा ढग येऊन त्याची सावली गडावर पडली. धोंडीचं लक्ष्य तिकडे गेलं. ती सांवली तशीच खालीं उतरत पवनेवर पसरली. उन्हाचा ताप निवाला.

धोंडी गडाकडे पहात राहिला. अन् पटकन् कोणी तरी त्याच्या अंतरांत बोललं,

" छेः, धोंडी ! तूं हवालदाराला साजेसं वागलास."

तो एकदम पाण्यांत उभा राहिला. गळाभर पाणी होतं तिथं. काय ? आपण वागलों तें बरोबर होतं ?

होय !

वाडवडिलांच्या कीर्तीला साजेसं !

त्याला त्याच्या घराण्यांत चालत असलेली आख्या आठवली.

त्याचा चौथा का सहावा आजा. दोघेच भाऊ. थोरल्यानं करूं नये तें केलं. वाडींतली एक सून अंगाखालीं घातली. त्याचा बाप पिसाळला. पोराचे पांच पाट काढून त्यानं त्याची धिंड काढली,–अन् पुण्याला सरकारांत नेऊन गुदरला. जन्मभर त्याला म्हणे बेड्या घालून कुण्या गडावर ठेवलं होतं. मेल्याची बातमी बापाला कळली. डोळ्यांत पाण्याचा टिपूस उतरला नाहीं त्याच्या ! त्यानं दिवसवारेहि केले नाहींत.

त्या घराण्याचा हा वारसा आपल्यापर्यंत आला. आपण काल तोच वारसा सांभाळला !

कांहीं वाईट केलं नाहीं. जें करायला हवं होतं तेंच केलं.

धोंडी स्थिरावला. डोहांत कांहीं सांपडलं नाहीं. तो कपडे नेसून तडक घरीं गेला.

सारजा डोळे पुशीत बसली होती. चूल थंड होती. मांजर मात्र म्याव म्याव करीत तिच्या भंवतालीं घोटाळत होतं. दोनचार बाया भंवतालीं बसल्या होत्या. धोंडीला पाहतांच त्या उठून चालत्या झाल्या.

धोंडी तिला धीर देत बोलला,

" ह्ये बगा, तुमी काई वाईट वकटं बोलला का त्याला ? "

सारजेला उमाळा आला. तिनं नुसती मान हालवली. धोंडी म्हणाला,

" मंग रडूं नगा. पानी द्या प्यायाला. मीं जातों पुन्ना भाएर त्याला बगाया."

घटाघटा पाण्याचा तांब्या रिचवून धोंडी बाहेर पडला, तो भुजाब्राच्या शेताकडे चालला. वाटेंत त्याला जो जो भेटे तो विचारी.

" घावला का कुटं ? "

" न्हाई. "

" आतां का करावं ? सकाळधरनं मीबी सोधीतोंय त्याला—"

" यील—"

" पर ह्ये असलं कसलं जानं ? जिवाला निसता घोर ! "

धोंडी भुजाबाच्या शेतावर पोंचला. भुजाबा हकीकत ऐकतांच बोलला,

" हवालदार, तुमी काईबी काळजी करूं नगा. माजं मन मला सांगतंय, कोंडी सुकांत हाय्. त्यो यील परत."

धोंडीनं पटकन् भुजाबाचे पाय धरले. भुजाबा संकोचून त्याला उचलीत बोलला,

" ह्याः ! ह्ये असलं कसलं हवालदार ! वळचणीचं पानी आढ्याला—"

" भुजाबा, तुमच्या तोंडीं साकर घालीन ! "

" काई नग साकर घालाया. आइकलं का—"

भुजाबाची बाईल शेण्या वेचीत होती, ती बोलली,

" काय ? "

" न्हव, मी जातों हवालदारांबरुबर."

" जा जा ! "

ते दोघे निघाले. संध्याकाळपावेतों त्यांनीं सगळं शिवार शोधलं. अचानक धोंडीला स्फुरलं,

" भुजाबा ! "

" का व ? "

" पर ह्यो गडावर म्हादेवाच्या द्येवळांत तर नसल ना झोपलेला ? "

" चला. बगून येऊं."

सरासरा दोघेहि गड चढून गेले. महादेवाचं देऊळ रिकामं होतं. विजेसारखी धोंडीला कल्पना धक्का देऊन गेली. तो हादरला. घोगऱ्या स्वरांत बोलला,

" भुजाबा ! "

" काय ? "

" कडेलोटाच्या कड्यावरून—"

" न्हाई न्हाई ! तसलं काई करायचा न्हाई त्यो."

" पर चला—"

धोंडीनं ओढीतच भुजाबाला कडेलोटाच्या कड्याकडे नेलं. जीव मुठींत धरून त्यानं खालीं डोकावून पाहिलं—

कड्याच्या पोटाशीं गाई चरत होत्या, अन् गुराखी शिट्या फुंकून कड्यांतून आवाज काढीत होते.

दोघेहि गड उतरले. भुजाबा बोलला,

" हवालदार, इक्ता ह्यो तापला कसा ? काल किशाला—"

धोंडी एकदम मागं फिरला. स्पष्ट शब्दांत तो म्हणाला,

" भुजाबा, मी हवालदार घरान्याचं ल्येकरूं ! हवालदारांनीं आजपत्तुर ज्ये क्येलं त्येच म्यांबी क्येलं ! माजं मन साक्षी हाय. का व्हायाचं असल त्ये होऊं द्या."

" सगळं चांगलंच हुईल. पर उगीच मनांत टोचत हुतं—"

ते दोघे घरीं आले. अजून सारजा तिथंच बसून होती. रडून रडून तिचे डोळे तांबडे लाल झाले होते. एक म्हातारी खोकत खोकत तिला धोंडीचा कालचा अपराध वानवानून सांगत होती. तिचं शेवटलं वाक्य धोंडीच्या कानीं पडलं—

" वंसाचा ह्यो येकलाच दिवा—मी सांगत्यें तुला सूनबाई काल लई चुकलं धोंडी हवालदाराचं—"

धोंडीचीं पावलं वाजतांच म्हातारी बाचकली, अन् सारवासारव करून म्हणाली,

" रडूं नगस सूनबाई ! जात्यें मी. गुरं घरीं याया झालीं. बांदायाबी कुनी न्हाई."

केरबा, परशा, अमरता, लक्ष्या,—सगळे एकेक येऊन बसले. कोणी बोलायचं साहस करीना. धोंडी हात मानेमागं घेऊन बसून राहिला.

अंधार पडत चालला.

तोंच धोंडीला कोणी तरी झांवळं झांवळं घरांत शिरतांना दिसलं—

तो हांकारला,

" कोण ? "

दबलेल्या शब्दांत उत्तर आलं,

" मी ! कोंडी ! "

सारजा उठत धाय मोकलून रडूं लागली. धोंडी म्हणाला,

" रडूं नगा आतां. पोर दीसभराचा उपाशी हाय,–चूल पेटवा. दिवा लावा."

*　　　　*　　　　*

त्याचं असं झालं होतं. पिंपरीच्या सांवलींत झोंपल्यावर बऱ्याच वेळानं कोंडीला हांक ऐकूं आली,

" कोंडीबा हवालदार ! "

दचकून कोंडीनं वर पाहिलं. वाडीचा भिम्या त्याला शोधीत हितवर आला होता.

" काय र भिम्या ? "

" काय राव ! किती सोधलं तुमाला ! "

भिम्या कोंडीजवळ बसला. हातावरची घोळलेली तंबाखू त्यानं चिमटींत धरून एका बाजूचं गालफड बाजूला ओढीत हिरडीच्या सापटींत ठेवून दिली, अन् मग हात झाडले. तंबाखूचे बारकाले कण कोंडीच्या डोळ्यांत गेले. तो डोळे चोळायला लागला.

पालथा होऊन त्यानं तोंड हातांच्या मिठींत दडवलं. त्याच्या पाठीवर धप्पा मारीत भिम्या म्हणाला,

" उटा राव ! सकाळधरनं सोधीतोंयू तुमाला ! काय काय झालं रातीं ? "

" काई न्हाई झालं."

" थोरला हवालदार बोलला का काई ? "

" ऊंऽहूं ! "

" येडाच हाय त्यो ! भावाची कड व्यायाची—"

तट्कन् कोंडीनं डोकं उचललं. त्याची नजर पाहून भिम्या थोडा वरमला. कोंडी बोलला,

" ऊंऽहूं ! तसलं काई बोलायचं न्हाई. माजा दादा हाय त्यो."

पचाक्दिशीं तंबाखूची पिचकारी टाकून बाहेर आलेला ओघळ पुशीत भिम्या बोलला,

" बरं बा - न्हायलं ! पर उटा आतां. पोरं कवाधरनं वाट पघत्यात तुमची."

" मी येनार न्हाई."

" का व ? "

" न्हाई येनार."

" वा राव ! असं करून कुटं भागतंयू ? "

" भागतंयू."

" काई भाकर तुकडा ? "

" न्हाई."

थोडा वेळ भिम्याहि पालथा पडून नदींत धोंडे फेकीत राहिला. अन् मग एकदम कोंडयाकडे वळून तो बोलला,

" कोंडीबा, असं करता का ?—"

" काय ? "

" चला लोनावळ्याला माज्यासंगट. "

" आर पर तू न्हाई ग्येलास आज दुद घ्येऊन ? "

" न्हाई. भाऊ ग्येला आज. मंग चलता का ? जरा बरं वाटल. वाइच बाजारांत हिंडूं. सांजच्या पारीं येऊं परत."

" निसतंच हिंडायाचं ? काई ख्यायाप्यायाचं न्हाई ? "

" ऊंऽहूं ! इठलशेट हाय का तिथला ? गुलकोजच्या चिकीचं दुकान हाये, आन् शेजारीच हाटेल हाये. तिथंच मपलं दूद जातं. त्याच्या हाटेलांत जाऊं."

" हाटेलांत ? "

" व्हयू. कां ? तुमी न्हाई गेलां कंदी जनूं ? "

" न्हाई बा."

" लई मजा असती. पाव पायला कंदीं ? पाव—"

" न्हाई बा ! "

“ हा यवडा आसतो. लई छान लागतो. च्या आन् पाव. आन् मंग लिमजीबी पायली नसल ? ”

“ ऊऽहूं ! ”

“ आन् मिसळ ? ”

“ छा ! ”

“ नसल पायली. कवा हाटेलात गेलाच न्हाई म्हंता—”

कोंडीला याचं मोठं वैषम्य वाटलं. हा वाडीचा भिम्या रोज लोणावळ्याला जातो ! तिथं रोज विठ्ठलशेटच्या दुकानांत जातो. गुलकोजच्या चिकीचं दुकान—कोण जाणे कसं असेल तें—अन् हा एवढा थोरला पाव अन् चहा खातो. लिमजी अन् मिसळहि —छे छे ! हा फार मोठा पुरुष आहे ! आपण त्याच्या मानानं अगदींच लहान.

कोंड्या लगबगीनं उठून बसला; घाईघाईनं बोलला,

“ भिम्या, तूं रोज जात असशील लोनावळ्याला ? ”

“ व्हय् ! ”

“ मंग मला न्हेशील का ? ”

“ चला कीं ! त्येच तर म्हंतोय्—”

“ पर हाटेलांत न्हेशील का ? ”

“ न्हीन त काय ! ”

“ पर—का र भिम्या—”

“ काय ? ”

“ हाटेल म्हंजी काई वाईटवंगाळ त नसल ? ”

“ न्हाई ऽ न्हाई ! मोट ऽ मोट ऽ फारशी आन् गुजरातीबी येऊन बसत्यात थितं ! बोलत्यात,–पोऱ्या, एक शिंगल चाय लाव.”

“ आर तिच्या मारी ! ”

“ सांगतोय् काय ! चला—”

कोंड्या उठला, अन् भिम्याबरोबर चालायला लागला. पण माळावर चढल्यावर त्याला आठवण झाली. तो बोलला,

“ भिम्या ! ”

" का झालं ? "

" आर पर व्हयनीला इचारलं न्हाई ! "

" मंग व्हयनी गागती का काय ! छाट्. चला राव ! आत्ता येऊं परत."

भिम्यानं कोंडीला ओढीत खिंडीच्या वाटेनं चालवलं. खिंड उतरून ते भाजावरून मळवलीला पोंचले. भिम्याजवळ रेल्वेचा पास होता. त्यानं कोंडीचं तिकिट काढलं. दहाची लोकल स्टेशनांत शिरली. त्या दोघांना घेऊन ती लोणावळ्यास पोंचली, आणि पुनः संध्याकाळीं तिनं त्यांना परत आणून सोडलं.

* * *

एकच दिवस. हवालदारीच्या बुरख्यांतून बाहेर निघून एकच दिवस कोंडी लोणावळ्यांत हिंडला. तो आणि भिम्या खूप भटकले. विठ्ठलशेटच्या दुकानांत बसून त्यानं एक सिंगल चहाबरोबर बनपाव खाल्ला. मिसळ चापली. भिम्यानं पुनः एका सिंगलची ऑर्डर दिली. तिथून बाहेर निघून ओंकारदीनच्या [illegible] दुकानांत पान खाल्लं. तिथून भूस आणि पेंडीच्या दुकानांत जाऊन ते दोघे गादीवर बसले ! स्वतः मालकानं त्यांना आदरानं बोलावलं. तिथून मग बाजारांत खूप फिरले. आज भिम्याच्या पिशवीचं तोंड सैल सुटलं होतं. त्यांनीं दोन दोन आण्यांची कुलपी मलाई पण खाल्ली ! कुलपी मलाई—!

भिम्या एका पारशाच्या बंगल्यावर रतीब घालायचा. त्या बंगल्यावरहि ते गेले. तिथं एक खूप मोठा कुत्रा होता, केसाकेसांचा. तो या दोघांना पाहून खूप भुंकला. पण साखळीनं गच्च बांधून घातला होता म्हणून तो चावला नाहीं. चावायला आला असता तर कोंडीनं एका लफाटींत त्याला त्या तितक्या लांब झुगारून दिला असता !

अन् मग—अन् मग बंगल्यांतून एक पांढरी स्वच्छ बाई बाहेर आली !

ओ हो ! कशी होती ती ? कशी ?

बगळ्यासारखी स्वच्छ—ऊंऽहूं ! बगळा नुसताच पांढरा असतो. ही थोऽडी लाल होती. उगीच रानचांफ्याच्या फुलांच्या ढिगांत एखादं

पळसाचं फूल ठेवावं तशी. पण किती छान ! तिचा गोरा-पान हात एकदां चापसून पहावा !

हेः ! हिच्यासारखी चांगली बाई सबंद तुंगींत तर नाहींच, पण पवन-पट्ट्यांत तरी असेल कीं नाहीं कोण जाणे ! आपल्याकडलीं बाया माणसं कोण जाणे कशीं हेंगाडीं असतात तीं !—दारशेना लावून काळेकुट्ट झालेले दांत—-ईः !

अन् किती गोड हंसली ती ! वाः ! काय सुरेख दांत ! वा वा ! जसे मक्याच्या कणसाचे दाणेच ! तसेच चकचकीत !

मग ती हंसून म्हणाली,

"का भिम्या, आमाला कवा नेनार तुमच्या गावाकरे ?"

काय ? ही पांढरी स्वच्छ बाई गांवाकडे येणार ? वाडीला ? म्हणजे तुंगीलाच कीं ! अरे वा !

ती गांवांत शिरल्याबरोबर—बरोबर—बरोबर—

एकदम लोटांगणच घालील कोंडी !

अन् मग मोठ्या अदबीनं गडाकडे बोट दाखवून म्हणेल,

"मी या गडाचा हवालदार !"

अन् वहिनी—हे: !

वहिनी फार वाईट बाई आहे. तिचा एक दांत पडला आहे. रात्रीची ती जोरजोरानं घोरते. लहानपणीं पडून तिचं एक बोट वाकडं झालं आहे—

तिला कोंडी या पांढऱ्या स्वच्छ बाईपुढं येऊं देणार नाहीं—

पण—पण गेली कीं ती ! दार लावून घेतलं ! 'जरूर या गांवाला' असं सांगायचं तसंच राहिलं कीं !

भिम्यानं कोंडीला धरून बाहेर ओढलं. डोळा मिचकावीत बोलला,

"कसा हाय नमुना ? गांवाकडे न्ह्या असं रोज म्हनीती ! या फारशी मालकाची लेक हाय ती. अजून लगीन न्हाई झालं !"

अन् मग बाकीचा दिवस कसा गेला तें कोंडीला कळलं नाहीं. तो शुद्धीवर आला वाडीकडून घराकडे परततांना. झर्ररर्दिशीं त्याची झांज उतरली. चोरासारखा तो घरांत शिरला, अन् येऊन मुकाट्यानं झोंपून राहिला.

पण कालच्या एका दिवसांतच त्याचा पुनर्जन्म झाला होता. त्याला भिम्याचा उपदेश आठवत होता.—

" ह्या राव ! कसली शेती करताय् ? बैलावानी राबत ऱ्हायाचं ! "

" मंग काय करायचं ? "

" दुदाचा धंदा करायचा ! "

" दुदाचा ? "

" व्हय् ! मपल्यावानी ! श्येतीचं कसलं आलंय् ! सालभर ढोरावानी म्हेनत करावी तवा कुटं दाना द्रिष्टीस पडायचा ! "

" व्हय् गड्या ! "

" तर काय ! न्हाई तर दुदाच्या धंद्याचं पघा. हिकडं दुद घालायचं, आन् हिकडं पैका. – रोख ! खनाखन् – ठनाठन् ! "

" ह्ये मात्तर खरं हाय्."

" अव माजंच बगा कीं ! गेल्या सालांत म्यां धा हज्जार रुपयांचा यापार क्येला ! "

" धा हज्जार ? "

" व्हय व्हय ! धा हज्जार. म्हंजी आसं पघा, रोज आट-धा रुपयांचा गल्ला यायचा माज्या खिशांत. आतां करा की हिसाब— "

कोंडीला हिशेब येत नसल्यानं त्यानं मान डोलावली.

" दुसरं कायबी न्हाय ! रोज कावड घ्यायाची खांद्यावर. मानसं दुद काढून टेवीत्यात. कराकरा व्हाना वाजवीत मळवली गाठायची—का साताची लोकल ! "

" कंदी उशीर झाला तर ? "

" व्हईल कसा उशीर ? अन् झाला तरी डायवर आपला दोस्त हाय. गाडी उभी करीतो मी येईपत्तोर. गाडींत बसलों र गड्या,–की कूक् ! निगाली गाडी,–का लोणावळा ! "

" रोज ? "

" अक्षी रोज ! लोनावळ्याला अदुगर इठलशेटचं हाटेल. मग थितं च्या पिऊन फारशाचा बंगला. थितं फारशाच्या पोरीसंगट दोन गोष्टी क्येल्या,

का मंग दुपारच्या गाडीपात्तोर हिंडा ना राजावानी ! हाय का कुनी इच्यारनार तुमाला ? ”

“ ती गोरी बाई रोज भेटती का तुला ? रोज हासती का ? ”

“ तर ! अर येकदा म्हन तिचा नवरोज का काय हुता – तवा तिनं मला केक धिला ! मला अन् तिच्या डायवरला ! ”

“ केक ? ”

“ व्हय्, पावावानी आसतो. अंडी घालीत्यात म्हनं त्यांत ! येक खाल्ला का पोट गच्च ! दुसऱ्या दिसापात्तोर भूक लागल का काय म्हंता ? ऊं ऽ हूं ! ”

“ भिम्या, तुला रोज यायाचा कटाळा येत न्हाई ? ”

“ कटाळा ? येड ऽ का काय ? अव, येकांद्या रोजीं न्हाई धावल यायाला तर मात्तर कटाळा येतो. आन् म्हाईत हाय का ? ”

“ काय ? ”

“ येखांद्या रातीं हितंच ऱ्हायाचं.”

“ कशापाई ? ”

“ शेणीमा पघायचा—”

“ व्हय् व्हय्. पर घरीं गागत्याल—”

“ घरीं सांगायचं, गाडी चुकली म्हनून.”

हें सगळं कोंडीला आठवलं. त्या एका दिवसानं जशी कांहीं त्याच्यावरून जादूची कांडी फिरवली. त्याला पंख फुटले. नवी दृष्टि आली.

हें कसलं ढोरासारखं शेतांत खपायचं ? छा ! बस्. दुधाचा धंदा करायचा.

पहाटे पहाटे त्याला झोंप लागली. सकाळीं तो जागा झाला. हळूच कानोसा घेतला, तों दादा शेताकडे गेला होता. मग आळस देत त्यानं घोंगडी फेकून दिली, अन् मागील दारीं येऊन बसला.

सारजा म्हशीचं दूध काढीत होती. तिला तो दारांत आल्याचं जाणवलं, पण तिनं मुद्दामच त्याच्याकडे बघितलं नाहीं. कोंडीला हंसू आलं. तो खाकरला. तरी वहिनीची नजर वळतां दिसेना. मग त्यानं हांक मारली,

“ व्हयनी ! ”

रागारागानं सारजा बोलली,

“ बोलू नका माज्यासंग ! ”

“ रागावलीस व्हयू ? ”

“ न्हाई ! लोभावली ! ”

“ व्हयन्ये, काल मी—”

“ काय बी सांगू नका मला. मला वाटलं का हिरींत उडी टाकून जीव द्यावा.—”

“ [illegible] —”

“ तुमचं तुमालाच गोड लागतं ह्ये ! माजं सवताचं पोर आसतं तर–”

“ काय क्येलं असतंस ? ”

“ उनांत बांधून घातलं असतं ! चार दीस खायाला घातलं नसतं.”

“ मंग मी कुनाचा हाय ? मी न्हाई का तुजा ? ”

“ मातीचा कुला त्यो. चिटकून का चिटकनार हाय ? ”

“ अस का ग ? तूं पघच मला बांदून. न्हातो का न्हाई पघ ! ”

“ बर न्हाल ! भूकभूक म्हनून मला खायाला उटाल.”

“ आगागायू ! तुला खाल्ल्यावर मंग मला ज्येवाया कोन घालील ? ”

“ घालील कुनीबी. आईबाई—”

पारशीण ? छे ! कोंडी रुसव्यानं बोलला,

“ व्हयनी, मी अशानं बोलायचा न्हाई बरं का ! ”

“ बोलूंच नका. माजं मस काम पडलं हाये.”

“ पर आइक की माजं—”

“ न्हाई—”

कोंडी उठून म्हशीजवळ गेला. वहिनीच्या पुढं बसून त्यानं तिच्या हातांतली चरवी हिसकून घेतली, अन् हंसत तिच्याकडे रोखून पहायला लागला. लटकंच रागावून सारजा म्हणाली,

“ हितं दावा पैलवानी ! चुलीजवळ—”

“ पर मी काल कुटं ग्येलतों—”

" कुटं ? "

" लोनावळ्याला."

" कुनासंगट ? "

" वाडीचा भिम्या—"

" ईळभर तिकडच व्हतां ? "

" व्हय्."

" अन् खानं-पिनं ? "

" खाल्ला म्या पाव—आन् च्या—आन् मिसळ—"

" पाव ? "

" व्हय्. तुलाबी दीन आनून—"

" मला नग त्ये तसलं दोडवानी ! कुटंबी जा, कायबी करा. तुमाला कोन इच्यारनार हाये ? "

" तूं इच्यार कीं ! "

" मी ? संबंद काय ? "

" असं काय ग करीती व्हयनी ? मी आतां तुला आंगटी करनार हाये—"

" आंगटी ? "

" व्हय्. –बोटांत घालायची."

" व्हय् – पर कुटून ? "

" दुदाचा धंदा करायचा आपल्याला."

" दुदाचा ? "

" व्हय्. भिम्यावानी. वाडीचे समदे बाप्ये त्येच करीत्यात."

" अन् ह्येन्ला इचारल्याबिगर ? "

" न्हाई; इच्यारायचं दादाला."

" कुनी ? "

" तूं. "

" मी ? मी न्हाई इच्यारायची."

" इच्यार की ग व्हयनी."

" मला भ्या वाटतं."

" कसलं ? "

" घरांतून काढून घेतील मला."

" काढून दिलं तर मी सांबाळीन. आपुन दोगं जाऊं मायलेकरं."

" कुटं ? "

" कुटंबी. ममईला. थितं हमाली करीन मी."

" पर भावजी ! "

" काय ? "

" श्येती कां गोड लागना तुमाला ? "

" मला न्हाई आवडत त्ये ढोरावानी खपनं."

" अन् हमाली आवडती का ? "

कोंडीनं उत्तर दिलं नाहीं. घुटमळून तो म्हणाला,

" मग इच्यारशील ? "

" माजा धीर न्हाई होत."

" जा ! मी ज्येवनारच न्हाई."

" खरं का काय ? "

सारजा उठली. तिनं दुधाची कासंडी उचलली. तें हांडींत ओतून चुलीवर तापत ठेवलं. भाकरी बडवल्या, अन् कोंडीला हांक मारली.

तो बैठकींतूनच ओरडला,

" मी न्हाई येत."

" चला लवकर. मला श्येतांत जायाचं हाय न्ह्यारी घेऊन."

" तूं इच्यारशील तर मी करतों न्ह्यारी."

" न्हाई इच्यारलं तर ? "

" मंग करनारच न्हाई. पुन्ना जाईल लोनावळ्याला. पाव खाईन— आन् च्या ! "

" इच्यारीत्यें ! चला."

कोंडीनं न्याहारी केली, अन् सारजा टोपली घेऊन शेताकडे निघाली.

## पवनाकांठचा धोंडी

वाटेनं तिचा जीव धडधड करीत होता. तिला नवऱ्याचा स्वभाव माहीत होता.

तो फार मोठा आहे. उंच ठिकाणीं जाऊन बसला आहे. त्याचं वागणं कित्येकदां आपल्याला कळत नाहीं. पण तो भलत्या वाटेला जायचा नाहीं. मुळींच जायचा नाहीं. बाभळीच्या खुंटासारखा उभा राहील. मोडेल पण वांकायचा नाहीं. त्याच्या मनांत जुना पीळ आहे. हवालदारीचा. त्या बाण्याला धक्का लागेल असं कांहीं घडायचं नाहीं त्याच्या हातून. तेव्हां आपलं मनोगत त्याला पटतं कीं नाहीं देव जाणे. पटवलं तर पाहिजे. धाकट्या दिराच्या मनानं तें घेतलंय्.–त्याचा जीव कांहीं शेतींत लागत नाहीं. रिकामटेकडेपणानं पोरगं वायां जाईल. त्याला कांहीं तरी मार्ग लावून दिला पाहिजे.

विचारांच्या धारेबरोबर ती शेतांत पोंचली.

* * *

ज्येष्ठ सरायला आला होता. आषाढ सुरू होण्यांत होता. सारं रान उन्हाळाभर तापून निघालं होतं. लहालहा करीत होतं. चालतांना पोटऱ्यांना त्याची धाप जाणवायची. धरतीला भेगा पडल्या होत्या. जणूं तिनं तोंडच वासलं होतं.

पण झाडंझुडपं मात्र उतलीं मातलीं होतीं. कांहींच्या अंगावर कोंवळी पालवी झुलत होती. तांबूस, सोनेरी, कोंवळी, लुसलुशीत. कांहींचा तांबूसपणा संपून गरगरीत हिरवा साज अंगावर साजत होता. कांहींच्या हिरवेपणांत काळी झांक मारत होती. माजोरीपणाची खूण. धाल्याची खूण. चेतना उताला जात असल्याची खूण.

मागास करवंदी अजून करवंदांनीं काळंजल्या होत्या. तोरणींना धुंदी चढली होती. कैऱ्या आंब्यावर झुलत होत्या—झोंके घेत होत्या. जीवनाचं गाणं गात होत्या. जांभळीहि काळ्या–जांभळ्या जांभळांनीं लादलेल्या होत्या.

गुराखी पोरं गुरं डोंगराला लावून द्यायचीं. मग करवंदीवर तुटून पडायचीं. त्यांना नेमकं माहीत,–मधासारखीं करवंदं कोणतीं, आंबूस कोणतीं.

संपायचीं सगळींच. पण गोड अगोदर, आंबूस नंतर. जांभळींवर धोंडे मारमारून तीं पोरं जांभळं पाडायचीं. झाडाखालीं हिरव्या कच्च्या जांभळांचा नुसता खच पडलेला असायचा.

कैऱ्यांची तर पोरांना फार माहिती. कोणता आंबा गोड, कोणता आंबट, कोणता खोबऱ्या, कोणता शेप्या, कोणता चिकाळ, कोणता ढेपाळ, कोणता मऊ, कोणता कडक,–सगळं रान त्यांना ठाऊक. तीं झाडांवर धोंडे मारताहेत. शेतकरी गागताहेत. धोंडा मारणारं पोर पळतं आहे. कुणी बापडा त्याची आईमाई काढीत त्याच्या मागं लागला आहे. बाकी पोरं खदाखदा हंसताहेत.

हें धोंडीच्या लक्षांत येतं आहे. तो त्या पाठीलाग्यावर कावतो आहे,

"अर जाऊं द्ये ! पोराची जात ! तोडला योक आंबा तर काई तुज्या आढींत खड्डा पडायचा न्हाई."

"व्हय् पर—"

अन् संपलं तें तिथंच.

धोंडीची नजर शेतांवरून फिरते आहे. माळ[illegible] धांवते आहे. अभिमानानं त्याची छाती उंचावते आहे. नम्रतेनं त्याची मान खालीं वांकते आहे.

शेतं अगदीं तयार आहेत. नांगरून, कुळवून, पाळी फिरवून. देखणीं दिसताहेत स्वच्छ. उपवर वधूसारखीं. उत्सुक. पावसासाठीं. जीवनासाठीं.

कुठं कुंद्याची पात नाहीं, का कुठं खतांतली काडी नाहीं.

मावळतीकडून ढग उठायला लागले आहेत. काळे काळे. भले भरदार. तूर्त नुसती पळापळ चालली आहे त्यांची. पण लवकरच ते जमून बसणार आहेत. शेकोटीभोंवतीं गोळा झालेल्या पोरांसारखे. भजनाला बसलेल्या टाळकऱ्यांसारखे.

धोंडीच्या जाणत्या नाकाला हवेंतला बदल कळूं लागला आहे. मेंढ्याला पाऊस येत असलेला कळतो. पण धोंडीला त्याच्या अगोदर जाणवतो. कोणता ढग फुसका अन् कोणता भरलेला हें धोंडीला बरोबर ठाऊक आहे. तुंगीच्या पलीकडे कळसाईचं शिखर आहे. त्याच्याभोंवतीं ढग

जमले कीं पाव कलाकांत ते तुंगीवर उतरायचे. अन् मग पांच मिनिटांत सगळं रान पावसानं गहिरं व्हायचं,–हें धोंडीला पाठ झालं आहे.

एक चौंढा भाजून तयार आहे. पहिला पाऊस सपकला कीं धोंडी भात अन् नागलीचं बीं फेंकणार आहे. पंधरा दिवसांत रोपं तयार. कीं मग कामाची तोबा गर्दी सुरू. ओकतीचं पाणी बंद. कारण वरचं पाणी भरपूर कोसळणार आहे.

धोंडी शेताकडे कृतज्ञतेनं पाहातो आहे.

या काळीनं त्याला कधींच फसवलं नाहीं. कधींच धोका दिला नाहीं. यानं श्रम केले,–भक्तीनं, श्रद्धेनं. तिनं पीक ओतलं त्याच्या पदरांत. तो म्हणतो आहे,

" काळी माय ! वाडवडलांचं ह्ये चालवतोंय् म्होरं. माजं कायबी न्हाई याच्यांत. वाडवडलांनीं तुज्यांत रगात वतलं. तूं त्यांच्यावर परसन झालीस. माज्याकुडनं तित्कं अजून घडलं न्हाई,—पर तूं घडवून घ्ये !

" माज्या पोटीं ल्येकरूं न्हाई. नसंना का ! कोंडीबाच माजं ल्येकरूं. वाडवडलांची ही कावड त्याच्या खांद्यावर ठेवीन, आन् तुज्या कुशींत झोपाया यीन मी ! माजी यवडीच सरदा हाय ! "

तोंच सारजा त्याला दिसली. त्याला भरून आलं. आज त्यानं एक अलौकिक केलं. कधीं नव्हत तो सारजेजवळ गेला. तिला पाटी उतरूं लागला. भरल्या गळ्यानं म्हणाला,

" न्हाऊं द्या त्ये. हिकडं या ! "

सारजेला लाजल्यासारखं झालं. हें असं कधीं घडलं नव्हतं. आज तिचा देव प्रसन्न आहे. ती पदर सांवरीत म्हणाली,

" व्हय पर – किसना—"

" अस ना त्यो ! ए किसना ! वाइच तिकडं बग. हिकडं बगूं नगस ! "

किसना हंसूं दाबीत खोंडामागं पळाला.

सारजा नव्या नवरीसारखी लाजत धोंडीमागं चालली. तो बांधावर जाऊन उभा राहिला. सारजा मर्यादेनं पलीकडे थांबली.

" ऊं हूं ! थितं नव्ह ! या हिकडं ! "

धोंडीनं सारजेला आपल्या अगदीं जवळ घेतलं. बोटानं दाखवीत तो म्हणाला,

" पघितलं का ह्ये शिवार ? "

" व्हय्."

" आठिवतं का ? लगीन झालं तवा तुम्ही न्हान हुतां. माज ऽ बा हुत ऽ तवा श्येतात असलीच म्हेनत व्हायाची. खरं का न्हाई ? "

" व्हय्."

" आज इकतीं वरसं झालीं. बा मरूनबी लई दीस झाल. पर मीं म्हेनतींत कुंच्या गोष्टीची कमी पडूं दिली न्हाई. दिली का ? "

" न्हाई."

" मी येकलाच नव्ह. आपुन दोघं खपलों. किसनाचा बा खपला. आतां किसनाबी म्हेनत करीतो. पर आपुन काशीची गंगा हितवर आनली, आतां कोंडीबाच्या गळ्यांत घालायचं ह्ये बारदान ! लई झाली पैलवानी. श्येताकडं पघा म्हनावं. त्यानं ह्यो बोजा घ्येतला, का आपुन दोगांनीं पंढरीला जाऊन यायाचं. जेजुरीला. लई दीस परपंच क्येला. आतां वाइच परमारत घडूं द्या म्हनावं आमच्या हातनं."

" व्हय् पर—"

धोंडीचं लक्षच नव्हतं. तो बोलत चालला,

" त्यो आपला गड पघा. वाडवडलांची विष्टेक हाय् ती. त्यो बाना म्या आजपत्तर चालविला. बर ऽ दीसबी आल ऽ; वंगाळबी आल ऽ. पर त्यो बाना हारपूं दिला न्हाई. समदा पवनपट्टा नांव घ्येतो. धोंडी हवालदाराचा सबूद लोक फुलावानी झ्येलीत्यात. अजून झ्येलीत्यात. पर आतां वझं वाटाया लागलंय्. तुमाला न्हाई वाटत ? "

" पर—"

" तुमालाबी वाटत असल. आतां येकदा दिराचं लगीन करून टाका. लई दीस झाल ऽ. नामांकित घरान्याच्या पोरी सांगून येत्यात. कुंचीबी येक पसंत करा. आन् मंग होऊं द्या धडाका. पर येक पघा मात्तर. पोर जी आनाल घरांत, ती कुनावानी आसल ? "

" कुनावानी ? "

" तुमच्यावानी. लाजूं नका. न्हानपनीं तुमी लई ग्वाड दिसत हुता–"

" काई तरीच— "

" काई तरीच कसलं ? खरं हाय त्ये. आतां काळींत राबून राबून माती झाली तुमची—पर मातीच व्हायाला हवी. आपुन तिचीं लेकरं—आलं का ध्यानांत ? "

" व्हय् पर––"

" न्हाई ! आतां उशीर करूं नका. पोरगा ईस वर्सांचा हुईल औंदा. लई वाढला. आतां लई बारकावा नका पघत बसूं. पोर दिसाया चांगला हाय्. येसनबी न्हाई कंचं. लई पोरी येत्यात—पास करून टाका येक त्यांतली—"

" पर—"

" आतां कशाचा पर ? "

" लगीन करायचं म्हंजे पैका नग ? "

" पैका ? न्हाईल उबा पैका. कुन्या गोष्टीची कमी न्हाई. पैका आपल्या पायांनीं धावत यील."

" न्यारी न्हाई करायची का ? "

" करायची कीं. वाडा."

सारजेनं दोन थाळ्या वाढल्या. धोंडीनं किसनाला हांकारलं. तो ओरडला,

" ह्यो गोऱ्हा लई पळतोय्. तुमी घ्या उरकून. मंग मी येतों."

धोंडी न्याहारीला बसला. हातच्या काडीनं एका ढेंकळावर टोच्या मारीत सारजा बोलली,

" मी म्हनत हुत्यें—"

" म्हना कीं ! "

" लई अडचन होती घरांत—पैका नसला की—"

" लागतो कशाला पैका ? आन्न हाय, त्येल हाय, दुद हाय, हांतरून हाय, पांगरून हाय—कुन्या कार्याला लागतो पैका ? "

" मपल्याला न्हव—"

" मंग ? "

" त्ये म्हंगाल न्हाईत—पर भावजींना—"

" कोंड्याला ? त्याला कशाला लागतो पैका ? कुडर्ती हायेत मलमलीच्चीं, धोतरं हायेत पांढरीं शिप्पक, जरीचा फ्येटा हाये, व्हाना हायेत—"

" व्हय् पर—"

" अजुनबी हायेच का पर ? श्येतांत येत जा म्हणावं किसन्यासंगट कष्ट कराया. आटवडयाला दीन तुलाबी पगार. आन् मंग वडगांवाला बाजारांत जाऊन घ्येत जा काईबाई—"

" पर धंदा दिला काडून त्यांना तर ? "

" धंदा ? आन् ही श्येती ? "

" श्येती न्हाई बरी वाटत त्यान्ला अजून."

धोंडी आश्चर्यानं सारजेकडे बघत म्हणाला,

" त्ये ठावं हाय् मला. पर कुंचा धंदा ? "

" न्हव—आपला—"

" बोला कीं ! वोकून टाका काय असल ती खळमळ—"

" दुदाचा—"

धोंडीनं हातचा घास तसाच टाकला. क्षणभर तो बोलला नाहीं. मग अवसान संभाळून म्हणाला,

" तुमचं दोगांच ठरलं आसलं—"

" न्हाई—व्हयच्च म्हणायचं तर काय ? "

" म्हंजी ह्यो वाडींतल्या बाप्यावानी खांद्यावर कावड घ्येऊन—"

" व्हय्—"

धोंडी भडकला,—

" आर चंडाळा ! कुठून बुद्दी सुचली म्हनावं ? तुज्या वाडवडलांनीं कुनीं क्येला होता का गोरसाचा इकरा ? "

एवढा भडका होणार, याची अंधुक कल्पना सारजेला होतीच. ती तसाच धीर धरून बोलली,

" न्हाई पर—"

" पर असत्यात कोमडीला ! त्या गाडवाला म्हनावं, हवालदाराच्या घरान्यांत कुनीं क्येला हुता का दुदाचा धंदा ? अर, तू त्या हवालदाराच्या वंसाचा दिवा ! समदा पवनपट्टा तुला हवालदार म्हनून मुजरा करनार ! आन् तू दुद इकितोस ? आर ईख का खात न्हाईस त्यापरीस ? "

सारजा मान खालीं घालून बसून राहिली. तिला वाटलं, कांहीं वेळानं हें थंड होईल, अन् मग आपण घरधन्याची समजूत घालूं. पण धोंडी अधिकच भडकत बोलूं लागला. थांबून थांबून. अधिक चढ्या आवाजांत.

" आर मर्दा, तुज्या वाडवडलांनीं शिवाजीराजाच्या वख्ताला तलवार मारली ! शिवाजीराजानं परसन्न होऊन ह्यो तुंगीगड धिला. त्याचा तूं हवालदार. या गडाचा – या गडाखालल्या पट्ट्याचा ! तुजा आजा दिमाखानं कचेरींत बसून या पवनपट्ट्याचा न्याव करायचा. हितलं भांडान वर जायाचं न्हाई ! हितल्या हितंच मिटायचं ! आजा शेजारीं तलवार ठेवूनशान बसायचा. मी त्याच्या मांडीवर बसून त्ये समदं कवतिक पधितलं—या – मपल्या डोळ्यांनीं. अन् मुर्दाडा, तू त्याच्या कुळाचा टेंभा दुद इकनार ? कुनींबी पोरासोरानं तुला हाक घालावी, ए दुदवाल्या ! हिकड ये ! आर आर आर ! थूः तुझ्या जिन्यावर !

" यापरीस हवालदाराचा वंस खंड झाला असता, तर त्ये लई बरं झालं असतं !

" आन् त्याला सल्ला द्येनार तुमी ! जा उटा ! न्हाई मला न्हयारी करायची ! उटा ! ! "

धोंडी तसाच न्याहारीची थाळी लोटून उठला, अन् बडबडत हातवारे करीत बांधावर जाऊन बसला. सारजा खालच्या मानेनं बसून राहिली. तिला मेल्याहून मेल्यासारखं झालं. कावळे झाडावर गोळा झाले होते. एकानं धीर करून उड्या मारीत ताटांतली भाकरी पळवली. त्याला हाकलायचं भानहि सारजेजवळ उरलं नाहीं.

धोंडी तट्कनू उठला. बोलला,

" जा उटा ! बसून नका -हाऊं ! जा जा ! "

तो ओकतीकडे चालता झाला. सारजेला हें लक्षण कांहीं बरं दिसलं

नाहीं. काय करावं हेंहि तिला कळेना. शेवटीं तिनं तें सगळं गोळा केलं. किसनाला हांक मारून त्याला न्याहारी वाढून दिली, अन् ती ओकतीकडे वळली. तिला पाहून धोंडी लोखंडी कांबीसारखा ताठ होऊन गरजला,

" हिकडं नका येऊं ! घरीं जा. अन् आपल्या शान्या दिराला सांगा. म्हनावं, थोरल्या भावाला ईख द्ये आनून, मंग हवा तो गोंदूळ घाल ! जा ! "

सारजेच्या डोळ्यांतून अपरंपार आंसवं वहायला लागलीं. पुसायचीहि चोरी.

धोंडी गायरानाकडे निघाला तेव्हां सारजाहि घराकडे परतली.

वाटेंत येसकरीण भेटली. तिनं सारजेचे तांबडे लाल डोळे पाहून पुसलं,

" हवालदारीन काकी ! काय व झालं डोळ्याला ? लई लाल दिसत्यात गुंजवानी—"

" न्हाई ग ! कचरा ग्येला डोळ्यांत."

" मी म्हंगाली – का काय झालं—"

घरीं कोंडी आतुर होऊन वहिनीची वाट पहात होता. त्याला कधींची भूक लागली होती. वहिनी येईना, म्हणून तो तिच्यावर रागावला होता. ती येतांच तो धुसफुसला,

" न्हा तिकडं श्येतांत पाकरं मारीत ! घरीं कुनी हाय, न्हाई—"

सारजा त्याला उत्तर न देतां घरांत गेली. कोंडी तिच्या मागोमाग जाऊन स्वयंपाकघराच्या दारांत बसला, अन् म्हणाला,

" मला भूक लागली कवाची—"

सारजानं न बोलतां त्याची थाळी वाढली. तिच्याकडे दुर्लक्ष करीत तो बोलला,

" उजवी का डावी ? "

उत्तर नाहीं.

" व्हयन्ये, मी मानूस बोलतोय्. गाडाव न्हाई."

" भावजी, मुकाट्यानं ज्येऊन घ्या. मला तरास द्येऊं नका."

" पर उजवी का डावी त्ये न्हाई सांगितलंस—"

सारजा स्थिर मुद्रेनं कोंडीकडे पहात म्हणाली,

" सांगूं का तुमच्या दादांनीं काय सांगितलं त्ये ? "

" सांग की ! "

क्षणभरानं आवंढा गिळून सारजा बोलली,

" तुमी अहा निसंग. पर म्यां अजून काई जोग घ्येतला न्हाई—"

" आर ! सांगनार हुतीस की ! "

" मी न्हाई सांगत."

" मंग म्हनालीस कशाला ? "

" उगीच."

" न्हाई. आता सांगितलं पायजे."

" भावजी, मला छळूं नका. तुमच्या पायां पडत्यें."

" आर द्येवा ! म्हंजी मी का जोशीबावा हाय का वागोबा ! "

" मला न्हाई ठावं. कुनीबी असा."

" मपला मी असन कुनीबी. पर सांग."

" सांगू ? "

" सांग कीं ! भ्या दावतीस का काय ? दादा का वाग हाय का शीव्ह ? "

" वाग शीव्ह परवडल ऽ ! "

" लई भडकला जनु ? "

" मला नका इच्यारू—"

" आर पर सांगनार हुतीस—"

" आइका. ते म्हंगाल—"

" काय ? "

" थोरल्या भावाला ईख आनून द्या, आन् मंग कायबी करा ! "

कोंडीची मुद्रा खर्रकन् उतरली. तो कांहीं वेळ विचार करीत राहिला. मग त्यानं विचारलं,

" लई बोलला का काय ? "

सारजा डोळे पुशीत म्हणाली,

" मला न्हाई ठावं ! "

" काय काय बोलला ? "

" मला नका इच्यारू."

कोंडी उसासा सोडून उठत म्हणाला,

" रामराज्ये करा म्हनावं ! हवालदारीच्याच डौलांत ऱ्हा ! कुनी न का इच्यारीना ! समदा गांव हासतो त्या हवालदारीला. पडक्या गडाचा हवालदार म्हंत्यात समद ! "

तो चालला, हें पाहून सारजा कळवळून म्हणाली,

" भावजी ! "

" भावजी खपला तुजा—"

" ताटाला लात मारून जाऊं नगा."

" मी ऱ्हाई जात. ताटानंच मला लात मारली."

सारजा पटकन् दारांत आडवी झाली. कोंडीचं खाणं तिला माहीत होतं. आज दोनतीन दिवस तो पोटभर जेवला नव्हता. म्हणून तिनं आवर्जून कांदा घालून शेंगदाण्यांचं झुणझुणं बनवलं होतं. तें त्याला फार आवडायचं. दाराला दोन्ही हात देऊन ती म्हणाली,

" भावजी, म्या झुनझुनं क्येलंय् ! "

" मला नग तुजं झुनझुनं—"

" आइका भावजी,—"

तो तिच्या हाताला झटत म्हणाला,

" हिकडं झुनझुनं करा, आन् हिकडं टकुऱ्यांत जोड ऽ हाना ! "

" भावजी—"

" खपला तुजा भावजी ! "

तिच्या हाताला झटका देऊन कोंडी बैठकींत गेला, आणि घोंगडी पांघरून झोपून राहिला.

सारजेच्या भोंवतीं काहूर माजलं. दादलाहि जेवला नाहीं. दीरहि नाहीं. दादला फडाफडा बोलला. बोलूं नये तें. आजवर इतकीं वर्षं गेलीं. तो हें असं कधींच बोलला नव्हता. दिरानंहि असला हट्ट कधीं केला नव्हता. आतां ती काय करील ? दोघेहि हट्टी. दोघेहि वांकायचे नाहींत. दोघेहि जेवायचे नाहींत.

पण स्वयंपाक केला पाहिजे. गुरवीण येईल. येसकरीण येईल. त्यांना वाढायला हवं.

तीनदां भाकरीच्या वाफेनं सारजाचा हात भाजला. पण आज तिचं लक्ष कशांतच नव्हतं.

दुपारीं धोंडी घरीं आला नाहीं. सारजा त्याची वाट पहात दाराशीं बसून राहिली. तेवढ्यांत हाटकरणीची पोर विरजण मागायला आली.

" सारजाकाकी, का व अशा बसल्या ? "

" उगीच."

" काई दुखऽतं का ? "

" ऊंऽहूं ! "

" मंग काई वाईटवंगाळ आइकलं असल."

" नाहीं ग बाई. तुला काय पायिजे ? "

" आईनं इरजनाला ताक मागितलं."

तिला ताक देऊन पुनः ती कोंडीजवळ गेली.

" भावजी ! अव भावजी ! "

एक नाहीं अन् दोन नाहीं. अंगावरची घोंगडी ओढीत सारजानं हांक घातली,

" अव भावजी ! असं नका करूं येड्यावानी ! "

कोंडीनं अंगाभोंवतीं घोंगडी गच्च गुंडाळून धरून ठेवली. सारजा गहिंवरून म्हणाली,

" ऊट माज्या ल्येकरा ! नग असा दावा धरूस ! "

तरीहि कांहीं नाहीं. बराच वेळ त्याच्या पाठीवर हात फिरवून शेवटीं उठत सारजा म्हणाली,

" नका आयकूं. त्यांचच भाऊ तुमी ! "

रात्रीं धोंडी अन् किसना घरीं आले. मळ्यांत बैलांसाठीं खोंडवा केला होता. त्याचं ओझं किसनानं गोठ्यांत टाकलं. म्हशीचं दूध काढल्यावर जनावरांसमोर दोन दोन मुठी हिरवा चारा टाकीत धोंडी बोलला,

" किसना, जा तूं आतां."

सारजा दारांत येऊन उभी राहिली. तिच्याकडे लक्ष न देतां धोंडी कचेरींत येऊन बसला. मंडळी जमली. चिलमीच्या धुरानं ठसकत हाटकर बोलला,

" औंदा पानी लवकर पडनार."

" पडूं द्ये बाबा ! पायजे तवा पडूं द्ये. पड येकदाचा म्हंजी झालं." माळी म्हणाला.

" हवालदार बरुब्बर सांगत्यात पान्याचं. सांगा हवालदार–" सुतारानं विचारलं.

धोंडी कांहींच बोलला नाहीं. समोर कोनाड्यांतली चिमणीची ज्योत धुरामुळं अंधुक झाली होती. धोंडीला वाटलं, सगळं असंच अंधुक झालं आहे.

मंडळी उठली. धोंडी बराच वेळ तसाच बसून राहिला. रात्र झाल्यावर तो उठला, आणि घटाघटा पाणी पिऊन कोठींत घोंगडी अंथरून पडून राहिला.

सारजा दाराशीं किती तरी वेळ वाट पहात उभी राहिली. मग तिनं भीत भीत विचारलं,

" ज्येवायचं न्हाई का ? "

" न्हाई; तुमी घ्या ज्येऊन."

" पान वाढलंय्."

" मला नगा तरास द्येऊं."

" भावजीबी उपाशी हायेत."

" का वाटल त्ये करा."

धोंडीनं पागोटं उशाला घेतलं होतं, त्यांत तोंड खुपसून तो झोपून राहिला.

* * *

दोन दिवस हें असं चाललं.

आयाबाया येत. त्यांच्याशीं संपादणी करीत सारजाला हंसून खेळून वेळ काढावा लागे. कसं लाजिरवाणं भांडण ! कुणाला कळायची सोय नाहीं.

पण एकटी असली कीं तिचे डोळे बारा वाटांनीं वाहूं लागत.

धोंडी शेतांत खपत होता. पावसाचा पहिला सपका शिंपून गेला. धोंडीनं नागली अन् भात चौंद्यांत पिस्कारलं. पाभरी उलगडून ठेवल्या होत्या, त्या जोडल्या. बाजरी, ज्वारी, खुरासनी, तूर, सगळं बीं तयार करून ठेवलं.

पण पोटांत अन्नाचा कण नाहीं !

धोंडी तर पार उतरला. जसा कांहीं आजारांतून उठलाय्. पाणी ढोसायचा, अन् झोंपून असायचा. दोन दिवसांत पोराच्या तोंडावर दुष्काळाची कळा आली.

तिसऱ्या रात्रीं धोंडी येऊन झोंपायला घोंगडी घालीत होता. त्याचा तोल जाऊन कणगीवर डोकं आदळलं. कणगीवरचं डालगं खालीं कोसळलं.

सारजा धडपडत आंत आली. तिच्याकडे न बघतां धोंडीनं अंथरुणांत मुसंडी दिली !

सारजा धुमधुम रडूं लागली. उसासा बाहेर टाकायची चोरी ! नवऱ्यानं तिलाहि दूर केलं ! तो एकटा हें सोसतो आहे — अगदीं एकटा !

रात्रीं धोंडी अचानक जागा झाला. त्याच्या पावलांवरून आंसवांचं पाणी खालीं ओघळत होतं. तो उठला. क्षणभरच थबकला. अन् मग मोठ्या स्नेहानं त्यानं सारजेचं डोकं आपल्या कुशींत घेतलं. तो तिला थोपटूं लागला. थोड्या वेळानं हुंदके आवरीत सारजा बोलली,

" आइकलं का ? "

" काय म्हंता ? "

" येक करायचं."

" काय ? "

" करीन म्हना."

" करीन."

" माज्या मागं माज्या ल्येकराचे हाल करूं नगा ! त्ये अजून न्हान हाय. त्याला कायबी समजत न्हाई. आन् माजं पुतळ्यांचं गाटलं माज्या सुनेच्या गळ्यांत घाला ! "

धोंडी कांहीं न बोलतां तिच्या केसांतून हात फिरवीत बसून राहिला. मग एक उसासा सोडून तो म्हणाला,

" तुमच्या ल्येकाला सांगा—"

" का ? "

" उंद्या पुन्याला बाजार हाय म्हनावं. तेरवां रातीं म्हशी हितं येतील—"

" खरं ? "

" व्हय्. पर तुमाला येक सांगून ठिवतों ! "

" का ? "

" त्येच्या म्हशींच्या दुदांतलं थेंबभर दुद माज्या पानांत पडतां उपेगाचं न्हाई—"

" व्हय्—"

" आन् त्याच्या दुदाच्या पैशांतला येक फद्याबी आपल्या संसारांत लागतां उपेगाचा न्हाई ! "

सारजा उठली. तेवढ्या रात्रीं तिनं स्वयंपाक केला. धोंडीला जेऊं वाढलं.

" तुमचा दीर ? "

" माज्यासंगट ज्येवतील त्ये."

कोंडी जेवत होता. सारजा डोळे पुशीत त्याला वाढीत होती. एक आंसवाचा थेंब त्याच्या पानांत पडला.

* * *

म्हशी आल्या कोंडीच्या म्हणून. अन् सारजेचं काम दसपट वाढलं.

धोंडीनं म्हशी आणून गोठ्यांत बांधल्या, अन् जें त्यांतलं लक्ष काढलं, तें रामा शिवा गोविंदा ! मग ओघानंच कोंडी अन् सारजा या दोघांना त्या म्हशींचं सगळं करण्याचा पत्कर घ्यावा लागला. कोंडीचं नांव आपलं उगीचच. तो नुसता तोंडपाटिलकी करायचा. प्रत्यक्ष काम सगळं सारजेकडे.

एवढ्या बस्खळ म्हशी गांवांत आल्या. भल्या थोरलाल्या कासा. तुकतुकीत रंग. डौलदार शिंगं. मग सगळा गांव गोळा न झाला तरच नवल.

हाटकर, येसकर, माळी, सोनार, पार झाडून सगळे बाप्ये येऊन गेले. म्हशींचं पोटभर कौतुक झालं. दूध किती निघणार यावर पैजा लागल्या. कितवीं वेतं त्याचे अंदाज झाले.

मग बायांची पाळी. अगोदरच हवालदाराचं घर सगळ्यांना आपलं घर वाटायचं. गव्हाचा रवा काढायचा, जा हवालदाराच्या जात्यावर. भात

भरडायचं, जा हवालदाराच्या घरच्यावर. फोडणीला तेल नाहीं, जा हवालदाराकडे मागायला.

हवालदाराच्या घरीं होती अन्नपूर्णा. त्यामुळं जो जो जी जी म्हणून कांमनां धरून यायचा ती ती सुफलित व्हायची. अन् त्यांत आतां पांच म्हशी !

हाटकरीनं नवऱ्याला म्हटलं,

" आइकलं का ?"

" का म्हंतीस ? "

" ही बकरी टाका इकून."

" च्या मारी ! आन मंग दुद ? "

" आतां आल्या की बख्खळ म्हशी हवालदारांच्या घरीं ! "

" व्हय्. त्ये बी खरंच हाय कीं ! मी इसरलोंच हुतों."

आयाबाया आल्या. त्यांनीं केल्यासवरल्याचा आव आणीत सारजेला सांगितलं,

" तुमाला सांगत्यें सारजाबाय्, तुमी बिब्ब बांदा म्हशींच्या गळ्यांत."

" न्हाई तर दिष्ट लागल."

" निसत्या बिब्ब्यांनीं काय हुतंय् ? न्हान न्हान पायतनांच ऽ तुकड ऽ बी बांदा."

" त्ये ग कशाला ? "

" ये ऽ बया ! हिला जसं ठावंच न्हाई ! "

" अग भुताखेताची बादा होत न्हाई ! "

" आन मी सांगत्यें तुमाला हवालदारीनबाई, आसरांच्या डव्हाला कंदीबी म्हशी जाऊं देऊं नका."

" का व ? "

" अव येकदा आसरा म्हशींचं दुद प्येल्या का, म्हंजी मंग थ्येंबभर दुद काई निगायचं न्हाई ! "

" बयागय ! "

" माजा भाचा असतो ममईला मिलांत. त्यो मला म्हंगाला, तुज्या गांवाला येऊन काय करूं ? तिथं काई मला च्या करायला दुद भ्येटायचं

न्हाई. मला लागतो ईळभरांतनं धाईसदां च्या. आतां मी धाडीनं त्याला निरोप. ये म्हनावं. हवालदाराच्या घरीं तूं आंगूळ करशील राजा गोपीचंद्रासारखा, इक्तं दुद !"

"बरं झालं बया ! ताक–धयाचा कार मिटला."

मग आलीं पोरंसोरं. कोंडी ताग रंगवून त्याच्या म्होरक्या वळीत बसला होता. हाटकराचं पोर म्हणालं,

"अगा बाबौ ! त्या म्हशीचं दुद तीन चार हांडऽ भरून निगल."

"कुंच्या र ?"

"आर ती ! गोंडेदार शेपटाची."

कोंडीनं दम दिला,

"ए अन्या ! रट्टा खायाचा का ?"

"का ?"

"बोटं नग दाखवू."

"म्हंजी काय हुतं ?"

"म्हशीचं दुद कमी हुतं."

"पर कोंडीदा, त्या म्हशीच्या पोटाला का झालं ?"

"कुंच्या ?"

"गोंडेवालीच्या पलकडल्या ?"

"आर गाडवा, ती गाभन हाय. ल्येकरूं हाय तिच्या पोटांत."

"माणसावानी ?"

"आत्तां का करावं याला ? अर शान्या, म्हशीला तुज्यावानी पोरं हुतात व्हय र ? तिला पाडा हुनार, न्हाईं तर पाडी."

"कोंडीदा !"

"काय र ?"

"या इकत्या म्हशींचं श्यान काय करनार तुमी ?"

"तुज्या टकुऱ्यावर वतनार. जा ! पळा आता ! जा आपापल्या कामाला."

कोंडी वहिनीला म्हणाला,

"व्हयन्ये !"

" का व ? "

" धाईस रुपै द्ये."

" आतां कशाला रुपै ? "

" काई चून—काई सरकी—काई प्येंड—आनाया नग ? "

" पर कुट्टन आननार ? "

" लोनावळ्याहून. भिम्या आन् मी जाऊन आनीतों बग."

संध्याकाळीं भूस, सरकी, पेंड, हें सामान येऊन पडलं. कोंडी पाय-पसरून बसला अन् म्हणाला,

" पानी द्ये प्यायला."

" पानी द्येत्यें. पर ह्यें समदं करायचं कुनीं भावजी ? "

" कां ? "

" म्हशीचं आंबोन, दुदं काढनं, धुनं, चाराकाडी—"

" तूं."

" मी ? "

" का ? मग त्यांत का झालं ? "

" आन् तुमी ? "

" मी ? मी दुद घ्येऊन जानार."

" निसतं दुद घ्येऊन जानार ? "

" मंग ? का न्हान काम हाय का त्ये ? "

" त्ये झालं. पर ह्यें समदं मीच करायची ? "

" किसना करील."

" त्यो न्हाई करायचा."

" का ? "

" त्यांना न्हाई आवडायचं. ठावं हाय का – त्यांनीं काय सांगून ठिवलय् त्ये ? "

" का ठिवलय् ? "

" तुमच्या दुदाकडला येक पैसा काई हिकडं घरांत वापरायचा न्हाई."

" न वापरूं द्ये. मी साटवून ठेवीन."

" मंग त्याचं काय कराल ?

" तुला अंगटी. – सोन्याची."

" ये बया ! मला घेतील घरांतून काढून."

" काढून घेतोय ! आतां म्हातारपनीं ! "

दोन-तीन दिवस लागतंसंवरतं होईतोंवर दूध गांवभर वांटलं गेलं. तिसऱ्या दिवशीं कोंडी कावड घेऊन सजला. जरीचा फेटा, ढोपरापावेंतों स्वच्छ धोतर. अंगांत बंडी. तिच्यावर मलमलची पैरण. कावड भिम्याच्या मदतीनं तयार केली.

निघतांना कोंडीला सारजेनं कुंकवाचा टिळा लावला, अन् बोलली,

" भावजी, जातांना वागोबाच्या देवळावरून जा."

" कशाला ? "

" देवाच्या पाया पडून मग जा."

" आर हो ! पर—"

कोंडीनं पटकन् सारजेच्या पायांवर डोकं ठेवलं. तिनं त्याच्या ओठांना हात लावला, अन् त्या बोटांचा मुका घेत म्हणाली,

" सांजच्या पारीं लवकर या. बरं का भिम्या ! पावसापान्याचं—"

" व्हय व्हय्. तुमी काई काळजी करूं नका ! "

" अग पर व्हयन्ये ! "

" का झालं ? "

" दादा कुठं हाय ? "

" त्ये ग्येल इरवाळींच उटून श्येतावर."

" आन मंग त्याच्या पाया पडायचं र्‍हायलं कीं—"

" र्‍हाऊं द्या. पावलं त्यांना. तुमी जा आतां."

कराकरा वहाणा वाजवीत कोंडीची कावड चालली. भिम्या अन् तो.

धोंडी गडाच्या सोंडेवर उभा राहून उदास दृष्टीनं या दोघांना दृष्टीआड होईपर्यंत बघत राहिला. मग उसासा टाकून आपल्याशींच म्हणाला,

" भले ! गाजिवनार ह्यो हवालदाराचं नांव ! वाडवडलांच्या गंगेची

कावड याच्या खांद्यावर द्येनार हुतों मी. ध्ये चंडाळा! बसली तुझ्या भावाच्या खांद्यावर इक्रीच्या दुधाची कावड. आर आर – थूः!"

त्यानं आपलं तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलं.

* * *

सातच्या लोकलला मळवलीवर दूधवाल्यांची ही गर्दी. पाऊसहि झाकोळून आला होता. म्हणून सगळे वेटिंगरूममध्यें गोळा झाले होते. कडकडा बोलत होते. भांडत होते. तंबाखू खात होते. पचापचा तिथंच थुंकत होते.

या दोघांना आंत शिरतांना पाहिलं, तसा बावधनचा भिकू गोपाळे गरजला,

"भले! या हवालदार!"

"आर इच्या मारी! हवालदारांनींबी कावड उचेलली का शेवटीं?" गोंद्या बोराट्यानं विचारलं.

"मग? कावड उचलनं म्हजी का चोरी? का चहाडी? का शिंदळकी? या तीन गोष्टींची चोरी. हाय का न्हाई बुवा? सांगा तुमी!"

बुवा पवार कराकरा मान खाजवीत अन् भली मोठी जांभई देत बोलला,

"आपल्याला गोपाळ्याचं बोलनं पास हाय."

"पास? आन माजं?' बोराटे कुरकुरला.

"त्याचं असं हाय, [illegible]रांत सांगितलंय, धंदा कुंचाबी वाईट न्हाई."

"पर हितं कुनाला कळतंय शास्तर?"

बुवानं त्याला चापलं

"अर तुला न्हाई कळत. पर आमाला कळतंय, – आमच्यावर तरी इस्वास करावा का न्हाई—"

पण तेवढ्यांत लोकल आली. धर्मशास्त्रावरची ती सखोल चर्चा अर्धवटच राहिली.

भिम्याबरोबर कोंडीहि कावड उचलून धांवला. संवय नव्हती. दूध हेंदकाळत होतं. एका डब्याचं दार उघडत नव्हतं दुसरा इंटरचा होता. तिसरा बायांचा. गाडीनं शिटी दिली. गार्डानं निशाण दाखवलं. धांवत पळत भिम्या एका डब्यांत शिरला. कोंडीहि तिथंच घुसला. पण बाकाच्या धक्क्यानं एक घागर मात्र डब्यांत पालथी झाली! डबाभर दूधच दूध.

"अरे रे रे रे! गेलं कीं रे वायां! सगळं सांडलं ना?"

" काय तरी माणसं बाई ! मेल्यांना चहाला दे म्हणाल्यें असत्यें इवलं, तर कांहीं दिलं नसतं."

" ए आई ग ! ह्या टाइमाला आपली मांजरी पाहिजे होती—"

" म्हंजे काय झालं असतं ? "

" वाः ! चाटून प्यायली नसती का ? आणूं का धावत धावत ? "

" हा मेल्या ! मांजर राहिली चिंचवडला ! बस जाग्यावर."

" ए दूधवाला, तुजा दूद लई फसकिलास होता. पान्याचा नांव न्हाई त्याच्यांत."

भिम्यानं कोंडीचं समाधान करीत म्हटलं,

" जाऊं द्या हवालदार. पयला डाव घेवाचा. किस्नार्पन म्हना झालं."

" व्हय पर—"

" उद्यांपून दगड घ्यायचे बरुबर."

" दगड ? "

" व्हय्. घागरींना उटकन लावाया. म्हंजी घागरी सांडत न्हाईत."

बघतां बोलतां गाडी लोणावळ्याला धडकली. भिम्याच्या पाठोपाठ कोंडी कावड घेऊन विठ्ठलशेटच्या हॉटेलांत पोंचला. दांतकोरण्यानं दांत कोरीत शेट म्हणाला,

" भिमाजीराव, हा नवा भिड्ड कोण ? "

" ह्ये तुंगीच हवालदार."

" असं असं ! म्हशी घेतल्या कीं काय ? "

" व्हय्."

" झालं. मग पवनेचं पाणी आणखी कमी होणार ! "

कोंडी हांसत बोलला,

" छा ! म्हशीला प्यायाला आसं कितीक लागतं पानी ? "

" म्हशींना प्यायला नव्हे,—"

" मंग ? "

" दुधांत पाणी नाहीं घालणार हवालदार तुम्ही ? "

" छा ! मपल्या दुधांत न्हाई पानी."

" बघूं ! "

दुधाच्या घागरींत बोट घालून विठ्ठलशेटनं तें गरागरा फिरवलं. मग त्याच हातानं आचमनभर दूध हातावर घेतलं. त्याचा भुरका मारीत शेट बोलला,

" काय सांगतांय् हवालदार तुम्ही ! पाणी नाहीं या दुधांत ? "

" छा ! योक थ्येंबहि न्हाई ! "

" अहो,–थापाहि पचतील अशा माराव्या ! कुणाचे अवतार तुम्ही ? "

" म्हंजी ? "

" नाहीं,–हरिश्चन्द्राचे, का धर्मराजाचे ? अहो, दुधांत पाणी न मिसळणारा गवळी अजून जन्मायचाय् म्हटलं ! "

कोंडीला कसंसंच झालं. दुधांत पाण्याचा थेंब नसतां हा बाबा त्यांत पाणी ओतलंय् म्हणतो—

" न्हाई ! मी न्हाई घातलं पानी दुदांत. आमच्या घरीं असलं खोटं कुनी करायचा न्हाई."

" अरे बाप रे ! खरं का काय ! ऐकलंत का विष्णुदादा ? "

" ऐकतोंय् – ऐकतोंय्—"

" भल्या माणसा ! अरे तूं व्यापार करायला निघालास. घातलं असशील दुधांत पाणी. सगळेच घालतात. पण माझ्याशीं बनवाबनवी ? अरे केस उन्हानं नाहीं पिकले ! आज बावीस वर्षं धंदा करतोंय्.—हें कारंजं माझं हॉटेल झाल्यावर बांधलं. हा डांबरी रस्ता माझ्या मागून केला. भल्या माणसा ! सुइणीजवळ लपवालपवी—? "

कोंडीचं तोंड तांबडं लाल झालं. त्याच्या डोक्यांत क्षणभर आलं, कीं ही पलीकडे असलेली भजांची परात घ्यावी,—अन् या विठ्ठलशेटच्या डोक्यावर पालथी घालावी ! पण तेवढ्यांत भिम्या बोलला,

" बऽरं ! आसल् दुदांत पानी — "

" अर न्हाई मर्दा — "

" ऐका तुमी हवालदार ! बोला शेट, लावायचा का रतीब ? "

" भाव काय ? "

" ज्यो रोज फुटल् त्यो."

" भले रे रतीब घालणार ! "

" मंग ? एखांद्या बारीला स्वस्त असतंय्–एखांद्या बारीला महाग—"

" चल उचल बाबा तुझी कावड."

" असं काय करताय् शेट ! अव तुमी बोला ! "

" तीन शेरांप्रमाणं घालायचंय् ? बोल. उन्हाळा–पावसाळा – एक भाव. अरे पण तूं घालतोसच कीं ! "

" व्हय् पर ! माजं न्यारं, हवालदाराचं न्यारं."

" तें न्यारं तुमचं तुम्ही बघा. घालायचं असेल तर मोजा पलीकडे— ए पोऱ्या, तें टेबल पूस ! पलीकडे पाणी दे बघत काय राहिलास ! काय सिनेमा आहे का ? "

" मंग कसं हवालदार ? "

" चल, बगून येऊं दुसरीकड ऽ ! "

" थांबा. मी मपलं दुद घालीतों."

भिम्यानं आपलं दूध मोजलं, अन् दोघे बाहेर निघाले. भिकूशेटनं हाकारलं,

" काय हवालदार, नाहीं पटत भाव ? "

भिम्या बोलला,

" येतो कीं जरा फिरून ! "

" फिरून याल तर मग चार शेर – बरं का ! "

ते दोघे वळणावर गेले. कोंडी थांबला. भिम्या म्हणाला,

" का हवालदार ? जायाचं का हाटेलांत परत ? "

" न्हव—तूं दुद घालीत हुतास—ती फारशीन—"

" अस अस !–ती व्हय् ? ग्येली ती मंडळी मुंबईला."

कोंडीसमोरच्या आभाळाला एकदम भगदाड पडलं. भिम्या म्हणाला,

" चला कीं ! येऊं चार ठिकानीं तपास करून. हलवायाकड ऽ—"

तोंवर रतिबाचे दूधवाले दूध घालून स्टेशनाकडे परत निघाले होते. हे दोघे चार सहा ठिकाणीं हिंडले. पण पाऊस सुरू व्हायला आला होता.

लोणावळ्याला हंगामी वस्ती. मोठमोठे बंगले पावसाळाभर मोकळेच असायचे. हंगाम उलगायला आला होता. त्यामुळं कोणी दूध घ्यायची उत्सुकता दाखवीना.

हे दोघे तसेच बाजारांत भटकत राहिले. तोंच हांक ऐकूं आली,—

" ए, दूधवाल्या ! "

कोंडीला कसंसंच झालं. एक पोरगी चक्क त्याला दूधवाला म्हणून हांक मारीत होती !

पण भिम्या सरावला होता. तो बोलला,

" काय हाय् ? "

" दुद आहे का ? "

" हाय् की ! "

" मग ये हिकडं."

ते दोघे त्या मुलीच्या मागोमाग निघाले. एका घरांत ती मुलगी शिरली. कोंडी दारांत उभा राहिला. त्याच्याच्यानं आतां सहन होईना झालं. त्याला वाटलं, कावड फेकून द्यावी, अन् पळून जावं !

घरांतून एक पट्टेवाला बाहेर आला. त्याच्या पट्ट्यावर म्युनिसिपालिटीचा पितळी बिल्ला दिसत होता. मध्यम वयाचा तो माणूस म्हणाला,

" हाय का बाबा शिल्लक दुद ? "

भिम्याच बोलूं लागला,

" हाय की ! "

" किती हाय ? "

" भरल धाबारा शेर."

" बरं झालं ! माझी खटखट चुकली. पर भाव काय ? "

" दीड शेर – पान्याचा ठिपका न्हाई दुदांत."

" छा ! मुंबईहून उतरल्यावानी नको बोलूंस. दोन शेरांनीं द्याल ? "

" समदं घ्यायाचं का ? "

" व्हय्."

" रोज घ्यायाचं का ? "

" रोज ? भले ! माज्या घरीं काय सदावर्त हाय, का अन्नछत्र ! भल्या मानसा, उद्यां हाय मुनशिपालटीच्या म्येंबरांची पार्टी. तवा त्यापायीं घ्यायाचं."

" बरं मग घ्या."

" या वर. सरू, आन बाई ! पातेलं आन."

नितळ मुद्रेची सरू पातेलं घेऊन आली. तिनं तें समोर ठेवलं, अन् दारांत उभी राहिली. कोंडीनं तिच्याकडे पाहिलं. भिम्याचं लक्ष गेलं, अन् त्यानं कोंडीला हळूच चिमटा काढला !

पट्टेवाला म्हणाला,

" मोजा "

कोंडी मोजूं लागला. पण तें त्याला जमेना. माप उणं तरी राही, नाहीं तर वाहूं तरी लागे. शेवटीं भिम्यानंच माप अन् घागर हातीं घेतली.

पट्टेवाला हंसून म्हणाला,

" नवीनच सुरू केला काय धंदा ? "

" व्हय्. आजपूनच. "

" गांव कोनचं ? "

" तुंगी."

" तुंगी ? तुंगीगड ? "

" व्हय्."

" कोन तुमी ? "

" ह्ये हवालदाराच भाऊ."

" अव म्हंताय् काय ! सरू, पळ पळ. च्या ठेव बाई ! अग ह्ये आपल सोयर ! "

सोयरे ? कोंडी त्या पट्टेवाल्याच्या तोंडाकडे बघूं लागला. पटकन् बसायला अंथरी घालीत तो भला माणूस बोलला,

" हिकड असे वर बसा. अव मी बेबेडोळचा—घारे ! धोंडी हवालदार म्हंजी लई मोठा मानूस. त्यांच भाऊ काय ह्ये ? छान छान ! मी हितं मुनशिपालटींत पट्टेवाल्याचं काम करीतों. आज सताठ धा वर्सं व्हायाला आलीं. सरूची आई गमावली तवापून—"

अन् मग चहा आला. घारे बोलला,

"सरू, थांब की! लाजूं नगस. ही येकलीच पोर. पांचवींत शिकती. बरं का सरू, ह्ये हवालदार रोज लोनावळ्याला येत जानार. कदीं पानी बिनी लागलं—आलं का ध्यानांत हवालदार! अव तुमी आमच सोयर. पुर्वापारचा तुमचा आमचा संबंद!"

घरीं कोण, काय, ही सगळी चौकशी करून घारे म्हणाला,

"बरं का हवालदार! लाजाबिजायचं न्हाई. अव उद्येग काय-कंचाबी करावा. मी न्हाई पट्टेवाल्याची नोकरी करीत? येत जा."

बरंचसं बोलून झालं. सगळं एकतर्फीच चाललं होतं. शेवटीं भिम्या म्हणाला,

"उटतों आमी आतां."

"या."

निघतांना पुनः कोंडीनं दाराकडे पाहिलं. तिथं कोणी नव्हतं.

बाहेर पडल्यावर कोंडीच्या पोटांत बोटानं टोचीत भिम्या म्हणाला,

"मंग का हवालदार? हाय का पसंत?"

"अर चल!"

"न्हव! अव आपलं उगाच पानीबिनी प्यायाला लागलं—"

*　　　*　　　*

हळूहळू कोंडी सरावाचा गडी झाला.

पावसाळा सुरू झाला. पाऊस धुवाधार कोसळायचा. पण कोंडीला संवय झाली—नव्हे चटक लागली. घोंगडीची खोळ करून नाले अन् ओढे पार करीत तो रोज भिम्याबरोबर लोणावळं गांठायचा. धनूभाईच्या हाटेलांत रतीब सुरू झाला.

पावसाच पाणी दुधांत पडे. हळूहळू कोंडीलाहि संवय झाली. पंधरा-वीस शेर दुधांत दोन चार शेर पाणी म्हणजे कांहीं मोठीशी बात नव्हे. त्या बाबतींत भिम्यानं कोंडीला गंडा बांधला.

तेवढी एकटीच बाब नव्हे. तंबाखू, पान तर सुरू झालंच; पण भिम्यानं कोंडीला सिगारेटचीहि दीक्षा दिली! प्रारंभीं कोंडी वहिनीला भ्यायचा. धोंडी तर इकडे लक्षच द्यायचा नाहीं, पण वहिनीचा मात्र धाक होता. हळूहळू तोहि ओसरत चालला.

धाक लागणं महाकर्म कठीण. पण कमी होणं मात्र सोपं. एकदां सारजेला कोंडीच्या खिशांत सिगारेट सांपडली. ती कोंडीसमोर धरून तिनं विचारलं,

" ह्ये काय भावजी ? "

" त्ये व्हय ? शिग्रेट. वढायची असती – इडीवानी."

" तुमी वढीतां का ? "

" कंदी कदी वढीतों. दादा न्हाई चिलीम वढीत ? "

सारजेनं हात जोडले. त्या रात्रीं तिनं हळूच धोंडीला सांगितलं,

" आइकलं का ? "

" का ? "

" भावजी शिग्रेट वढीत्यात म्हनं—"

धोंडी कूस बदलून म्हणाला,

" काईबी करा ! मला नगा सांगू ! "

चहा, पाव, हें तर नेहमींचंच झालं. घरची भाकरी कोंडीला गोड लागेना. भजांशिवाय एक दिवस त्याचं जेवण होईना. कधींमधीं तो वहिनी-वर डाफरायचा,

" कसं आन्न शिजविती ! "

" का झालं ? "

" का त्याला काई चव का ढव ? "

सारजा श्वास सोडून म्हणायची,

" तुमाला लागली हाटेलांतलं खायाची सवे."

एका दिवशीं लोणावळ्याला कोल्हाटणीचा तमाशा होता. भिम्यानं कोंडीला आदल्या दिवशींच बातमी देऊन सांगितलं,

" उंद्या न्हायाचं लोनावळ्याला."

" आर पर दुद—"

" आनील येक रोज किसन्या— "

" पर व्हयनी रागावल बिट्या ! "

" तर तर ! कोमडीच्या पिलावानी डालून ठीव म्हनावं टोपल्याखालीं ! काय हवालदार ! सवताचा धंदा करीता ! इत्ता काय धाक व्हयनीचा ? "

" न्हवं – पर दादा—"

" इच्यारीतो का दादा तुमाला काई तरी ? येक सबूद काई बोलत न्हाई तुमंच्याशीं. त्ये काई न्हाई,—"

" आर पर घरीं काई सांगाया नग ? "

" गाडी चुकली म्हनून सांगायचं—"

दुसऱ्या दिवशीं कोंडीनं तमाशांत सगळी रक्कम उडवली. चवल्यावर चवल्या झडल्या. भिम्यानं गंमतीवर गंमती केल्या. कोंडीच्या कानाच्या पाळींतच चवली अडकवून कोल्हाटणीला न्यायला सांगितली. त्या बनेल बाईनं चवली तर काढलीच,–पण या तरण्याबांड पोराचा गालगुच्चाहि काढला !

कोंडीला वाटलं, कड्याखालीं धुमारून फुललेल्या कारवीचं रान माजलंय्, अन् आपल्याला कड्यावरून त्या रानांत लोटून दिलंय् !

दुसऱ्या दिवशीं दूध जाऊं शकलं नाहीं. धोंडीला कुणीं बातमी सांगितली. त्याला वाटलं, खालीं आग पेटली आहे, अन् त्या आगींत आपला कडेलोट केला गेला आहे !

* * *

गुणे मास्तरांचं सरूवर फार प्रेम.

जगतापबाई लोणावळ्याला शाळा तपासायला आल्या कीं गुणे मास्तर सरूला त्यांच्यापुढं उभी करून विचारीत,

" सांगा बाई तुम्हीच ! चांगली संधी मिळाली तर ही मुलगी इन्स्पेक्ट्रेससुद्धां होईल कीं नाहीं ? "

जगतापबाई जांभई देत म्हणत,

" होईल तर काय झालं."

" होईलच मुळीं. मी तर म्हणतों, एखाद्या ट्रेनिंग कॉलेजची प्रिन्सिपॉल-सुद्धां होईल."

अर्थात् बाई यावर कांहीं आक्षेप घेत नसत. पण त्या गप्प राहिलेल्या पाहून मास्तर उसळून म्हणत,

" मी विचारतों, कां होऊं नये ? आं ? कां होऊं नये ? "

अन् मग ते हिरीरीनं तिच्या बुद्धिमत्तेचं वर्णन करून शेवटीं म्हणत,

" सबंध जन्म गेला माझा पोरं शिकवतां शिकवतां. पेन्शन चार महिन्यां-वर येऊन थांबलंय् पण अशी अद्‌भुत बुद्धीची मुलगी मीं पाहिली नव्हती ! "

" असं का ? "

"अहो खोटं सांगतों कीं काय ! धडा एकदां कानांवरून जायचा अवकाश. झालाच वज्रलेप म्हणून समजा ! आतां सहावींत आहे मुलगी. म्हणजे— बापानं शाळेंतच उशिरा घातली – आईवेगळी पोर म्हणून. एक-दोन वर्षं अभ्यास झालाच नाहीं. घरचं कोणीं करायचं ? तर काय म्हणत होतों ? हो, मुलगी सहावींत आहे. पण पहिलीपासूनच्चीं सगळीं पुस्तकं तोंडपाठ म्हणून घ्या कीं—अक्षर न् अक्षर,-ओळ न् ओळ."

" खरं का काय ? "

" पहायची परीक्षा ? ये बाई सरस्वती—"

" नको नको ! तुम्ही कशाला खोटं सांगाल ? "

" नाहीं पण पहा कीं ! पांचच मिनिटं —"

" राहूं द्या या पाळीला. पुनः केव्हां तरी."

" एवढ्यानं काय झालंय ! रामायण वाचवून घेतलंय् मोरोपंतांच्या आर्या शेंचारशे पाठ करून घेतल्या आहेत. केकावलि—झालंच तर चित्रं अशीं छान काढते ! "

" वा: ! "

" पण——! "

" काय झालं हो ? "

" अहो बाप आहे अडाणी ! "

" काय म्हणतो ? "

" तो लागलाय् हिचं लग्न उरकून टाकण्याच्या मागं ! आतां तुम्ही सांगा बाई, नुकतं पोरीचं पंधरावं सरलंय्. मी म्हणतों, कां एवढी घाई हो ? "

" हो. कां घाई ? "

" शिकूं दे कीं म्हणावं ! "

" शिकूं दे कीं ! "

" अहो ऐकत नाहीं ! म्हणतो मुलगी फार वाढली ! बाई – मी म्हणत होतों—"

" काय ? "

" नाहीं – तुम्ही सांगून बघा कीं ! "

" खरं आहे तुमचं, गुणे; आलं का लक्षांत ! पण माझं बाई असं आपलं एक तत्त्व आहे हो—! "

" कसं ? "

" अनोळखी माणसावर एन्फ्ल्युएन्स टाकायचा नाहीं. अहो पटकन् त्यानं केली वर तक्रार – तर घ्या काय ! खरं कीं नाहीं ? "

गुणे मास्तर चरफडत, अन् सुस्कारा टाकून गप्प बसत.

सरूलाहि असंच वाटे. आपण येत्या वर्षीं फायनल होऊं. मग तीन वर्षांचं ट्रेनिंग उरकून घेऊं. त्याबरोबरच मॅट्रिकलाहि बसूं बाहेरून. अन् मग–

एखाद्या गांवीं तिथली मुलींची शाळा चालत नसेल—

आपण तिथं जाऊं, अन् वर्षा दोन वर्षांत शाळेचं रंगरूप अगदीं बदलून टाकूं—

पण तिचा बाप जेव्हां शेजारच्या भाऊ टिपऱ्याशीं तिच्या लग्नाच्या गोष्टी बोलूं लागला, तेव्हां ती धास्तावली ! एकदां ती अभ्यास करीत बसली होती. शेजारचं बोलणं तिला ऐकूं यायला लागलं. दुसरीं माणसं बोलत असलीं म्हणजे तें ऐकत बसूं नये, असं तिला गुणे गुरुजींनीं शिकवलं होतं. पण तें बोलणं इतकं जवळ चाललं होतं – कानांत शिरून मनावर ओरखाडे काढीत होतं—

" मग काय ठरलं घारेदादा ? " त्याबरोबर मिशिनीचा अन् कात्रीचा आवाज.

" ठरायचंय् काय ? औंदा उरकून टाकायचं म्हंतों."

" अहो फायनल होऊं द्या कीं ! "

" त्याचं असं हाय भाऊ, – तिची आई न्हाई. आपलं पोरीला पंख फुटायच्या आंत कुठं तरी गुतवून टाकलं का मी झालों मोकळा ! "

" पण अलीकड म्हणे पोरींचं मत्त घ्यावं लागतं—"

" त्ये वान्या-बामनांत. आमच्यांत न्हाई. अव, या लोंढे डाक्टराची मुलगी – शीक शीक शिकली. बीए का फीए झाली ! आन् आतां लगीनः हुईना ! "

" तें खरं हो ! पण — "

" ऐकलं का भाऊ, माजी ही येकलीच पोर. तिचा सुकाचा संसार पाह्यला कीं डोळ निवत्याल माज ऽ."

सरूनं उदास होऊन हें गुणे मास्तरांना सांगितलं. त्यांनीं दचकून घारे-दादाला स्वतः सांगून पाहिलं. रागावले, रुसले, विनवण्या केल्या. शेवटीं म्युनिसिपालिटीच्या प्रेसिडेंटांकडून सांगवलं. पण घारेदादा आपल्या निश्चया-पासून ढळला नाहीं.

तो तरी काय करील ? त्याचं जग वेगळं, गुण्यांचं वेगळं.

दिवाळीची सुट्टी संपली. सरू पुनः शाळेंत जाऊं लागली. एका शनिवारीं घारेदादा म्हणाला,

" सरूबाय् ! "

" काय दादा ? "

" उंद्या मी जरा तुंगीला जाऊन यीन म्हंतों."

" तुंगीला ? ते दूधवाले – त्यांच्या गांवीं ? "

" हेः ! दुदवाले म्हनूं नये. तो मोठा मानकरी हाय त्या पट्ट्यांतला."

" याल केव्हां ? "

" सांजच्या पारीं."

पहिल्या लोकलनं घारेदादा मळवलीला उतरला. तुंगीची वाट धरून तो पाऊल उचलीत निघाला, तों वाटेंत कावड घेऊन चाललेला कोंडी भेटला.

" कां दादा ? हिकड कुटं ? "

" त्या आपल्या ह्या – आंबेगांवला जायचंय्."

" मंग तुंगी वाटंतच हाय कीं ! दादाला भ्येटा. त्याला बरं वाटल."

" व्हय व्हय. घरींच हायेत का ?—"

" छा ! तो ग्येला खुरासनी बांदायला. तुंगींत गेल्यावर कुनालाबी हवालदाराच धा एकर इच्यारा. वाटचा कुत्राबी सांगल."

" बरं बरं, तुमी चला. गाडी चुकल तुमची."

" आन् – आन्—"

" का व ? "

" न्हव – तुमची—"

" मुलगी व्हय ? सरू. ती न्हाई आली. का व हवालदार, तुमी आमच्या घरीं येत न्हाई ? "

कोंडी लाजला. भिम्यानं संपादणी केली,

" हवालदार सोयऱ्याच्या घरीं यायला लाजत्यात ! "

घारेदादा हंसत हंसत म्हणाला,

" असं असं ! बरं, चला तुमी."

मधली खिंड ओलांडून घारेदादा बोल बोल म्हणतां तुंगींत पोंचला. गांवांत चौकशी करतां हाटकराच्या पोरानं त्याला दहा एकरांत नेऊन गुदरलं.

धोंडी, सारजा, अन् किसना, तिघंहि खुरासनी गोळा करीत होतीं. काल खुरासनीची सोंगणी झाली होती. अधिक तापूं दिली असती तर दाणे रानभर झाले असते. म्हणून सकाळीं दंव ओसरलं नाहीं तोंवर ती खळ्या-वर पोंचवणं भाग होतं.

सारजेनं घारेदादाला येतांना पाहिलं. हातचा कवळा ढिगांत टाकीत ती बोलली,

" कुनी आलं वाटतं तुमच्याकडं—"

धोंडीनं निरखून बघितलं. पण त्याला कांहीं उमज पडेना. तोंवर घारेदादाच जवळ आला, अन् बोलला,

" रामराम हवालदार ! "

" रामराम ! कुनीकडं आली सवारी ? "

" तुमच्याकडंच."

" मीं न्हाई वळिकलं."

" येकदम न्हाईच वळिकनार तुमी. लई दिसापुर्वी गाट पडली हुती."

" कुटं बा ? "

" पाटकवडीला गोइंदा भेगड्याचा दिवस हुता का ? "

" व्हय व्हय—"

" तवा पंचाईत भरली हुती. तवा थितं गाट झाली हुती."

" या, बसा की——न्हाई तर ही इक्ती खुरासनी घ्येऊं का हातासरशी गोळा करून ? "

" घ्या ना ! मला दुसरं कंचंबी काम न्हाई. तुमाला भेटायाच आलों."

" आर इच्या मारी ! मंग न्यारी बिरी ? "

" झालंय् माजं सगळं—"

" छा छा ! असं कसं हुईल ? आइकलं का ? पाव्हन ज्येवाया हायेत. जा तुमी घरीं. आन् जरा इरवाळीच होऊं द्या सैपाक ! "

सारजा घरीं निघाली. धोंडीनं विचारलं,

" तमाखु वढीता का ? "

" न्हाई. तुमी चालूं द्या. बसतों मी हितं बांदावर."

धोंडीनं भराभर हात चालवून खुरासनी बांधली. किसनानं सगळे भारे खळ्यावर नेऊन टाकले. मग पागोटं काखेंत घेत धोंडी म्हणाला,

" या, तिकडं खळ्यावरच बसूं."

दोघे खळ्यावर पोंचले. नाना परीच्या मालानं खळ्याभोंवतीं गर्दी केली होती. भल्या थोरल्या चार धोंड्यांवर चार लांकडं टाकून त्यावर भात रचलं होतं. पलीकडे नागली. अलीकडच्या अंगाला खुरासनीची रास. एका कोपऱ्यांत वरीचा लहानसा ढीग होता. पलीकडील शेतांत बाजरीहि फुलवरा उलटून निंबुरावर आली होती; पंधरा दिवसांत ती काढायला झाली होती. भलं मोठं मनगटासारखं कणीस. दाण्यांनीं गच्च भरलेलं.

जमिनीची ती आगळी श्रीमंती पाहून घारेदादाला मोठा संतोष झाला. घोंगडीनं खालचा कचरा झाडून ती अंथरीत धोंडी म्हणाला,

" या, बसा."

" लई बरं वाटलं बघा ह्यो सगळा बारदाना बघून ! "

धोंडीला मूठभर मास चढलं. तो म्हणाला,

" काळीची कुरपा हाय ही! जित्की म्हेनत करावी तित्कं तिचं येनं. ए किसना, आर ती कालवड तिकडं कांद्यांत चालली पघ! अगा गावड्ये! हान तिला! टोला नको हानूं. निसतीच हाकल! पाव्हन, ह्यो माळवा हाय, त्योबी आपलाच बरं का!"

" वा वा!"

" माजं काई न्हाई; वाडवडलांनीं नांव क्येलं, त्ये म्होरं चालवायचं. चार मंडळी मानीत्यात, हवालदाराचा मान राग्वीत्यात. आपुनबी आपल्या-कडनं हुईल तित्कं करायचं."

" वा हवालदार! तुमचं घरानं लई परख्यात! त्यो आब तुमीबी राखलाय् अजून. अव, आमीबी तुमच जुन सोयर!"

" त्ये कस काय बा?"

" मी बिबेडोळचा घारे!"

" खरं का काय?"

" व्हय—"

" म्हंजी आमची आजी बिबेडोळची—"

" व्हय. माज्या बाची ती चुलत मावळन—"

" वा! म्हंजी जवळचंच नातं हाय की!"

" व्हय्,–त्ये पुन्ना—पर तुमाला येक इच्यारायचं हाय."

" का?"

" भावाचं लगीन कवा करायचं?"

धोंडीची मुद्रा गंभीर झाली. पलीकडे उलगलेल्या भातचोंढ्यांत बैल चरत होते. त्यांतला भिवऱ्या बाजरीला नादावला. त्यानं येऊन बाजरीच्या पिकांत तोंड घातलं. पटकन् धोंडी उठला. तो एक लहानसं ढेकूळ उचलीत ओरडला,

" आर ए भिवऱ्या! आर तिच्या मारी – भिवऱ्या म्हंतों भिवऱ्या!"

धोंडीनं ढेकूळ बैलाकडे भिरकावलं. लागावं हा हेतु नव्हताच. लागलंहि नाहीं. पण बैल उमगला. मुकाट्यानं बाजरींतून तोंड काढून बैलांत जाऊन मिसळला.

घारेदादानं विचारलं,

" जबाब न्हाई दिला हवालदार ? "

निश्चयी स्वरांत धोंडी बोलला,

" त्याचं असं हाय् सोयरे ! भाऊ माजा येकच हाय. म्हंजे घरान्याचा वंस त्योच चालिवनार. मला ल्येकरूबाळ न्हाई. व्हायाची आसाबी न्हाई. तवा लगीन तर त्याचं करायचंच – पर—"

" बोला कीं ! "

" पर समद सांगून करायचं ! "

" काय असल तें सपष्ट बोला. मी कुनी परका न्हाई."

मग धोंडी बोलूं लागला–बांध फुटावा तसा. आपला लौकिक. आपले कुळाचार. आपल्या घराण्याची प्रतिष्ठा. वाडवडिलांनीं गांवासाठीं वाहिलेलं ओझं. तुंगीगड. दहा एकर. आपली जमिनीवरील निरतिशय श्रद्धा–भक्ति – नाना परी.

घारेदादा म्युनिसिपालिटींत पट्टेवाला होता. त्यानं अनेक भाषणं ऐकलीं होतीं – भल्याभल्यांचीं. पण आजचं हें छाती फोडून वहात असलेलं भाषण– त्यानं असं कधींच ऐकलं नव्हतं !

ओबडधोबड शब्द. अर्धवट तुटकीं वाक्यं. पण त्यांतलं ओज, आवेश, श्रद्धा, – सगळंच अगदीं वेगळं होतं.

शेवटीं धोंडी म्हणाला,

" असा आमचा वंस,—पर – मला माज्या भावाबिगर दुसरं कुनी न्हाई.—पर – कारबारनीचाबी लई जीव हाय त्याच्यावर – पर—"

" बोला हवालदार ! गंगाबाईला अस ऽ खंड पडत नसत्यात,–बोला."

" मला त्याच लक्षेन काई धड दिसत न्हाई."

" का ? "

" सोयर ऽ ! का म्हनून इच्यारतां ? अव, त्यो गवळ्याचा धंदा कराया लागला ! "

" बरं ! मग ? "

" इकत्यानं भागलं न्हाई. त्यो वाईट मानसाच्या नादानं वाया चालला ! "

" का का करीतो ? "

" अव, शिग्रेटा का का म्हंत्यात त्या वोढीतो ! "

" आनीक ? "

" अव, परवां म्हन त्यो कोल्हाटनीच्या गान्याला बसला हुता ! "

" ठावं हाय मला."

" म्हंता काय ! तुमाला कसं ठावं ? "

" मीबी लोनावळ्यालाच ऱ्हातों."

" अव सांगतांय् काय ? "

" व्हय्. मी रोज पघतों त्याला."

" मंग झालंच म्हनायचं ! हवालदाराचा वंस म्हनून कुनीबी फसता कामाचा न्हाई ! ह्ये इक्तं समदं सपष्ट सांगायचं, अन् मंग म्होरलं बोलनं."

" बोला."

" तुमचं कोन हाय लग्नाचं ? "

" माजी ल्येक."

" कुटं आसती ? "

" माज्यासंगटच ऱ्हाती. लोनावळ्याला,—पर सोयर, अस न्हाई करायच ! "

" मंग ? "

" तुमी माज्यासंगट चला. एकदां पोरीला पघा आपल्या डोळ्यांनीं. मग बोलायचं."

" अव अस कसं—"

" न्हाई ! मुलगा म्यां पाह्यलाय्. मला पास हाय त्यो. येसनं कुनाला नसत्यात ? म्हादेव इक्ता सव देवनका बावा, पर त्यालाबी गांजाचं येसन हाय म्हंत्यात. आन् माजी मुलगी लई श्यानी हाय. ती तवाच दूर करील समदीं येसनं."

" न्हाई पर निसतं कसं यायचं ? ठरलं न्हाई, काई न्हाई—"

" त्ये मागून. मुलगी पास झाली तर मंग त्ये होईल समदं. चला तुमी. इक्तं ऐका माजं."

" अव पर हवालदाराच्या घरान्याला तसं कसं सोबून दिसल ? "

" चट सोबून दिसतंय्. तुमची आजी तर पानी भराया नदीवर ग्येलती. तुमच्या पंजोबानं घोडा पान्यावर धरला तवा पघितली; आन् आमच्या घरीं येऊन तशीच मागनी घातली. आतां चलायचं ? "

" बरं ! आतां असं करायचं. घरीं चलून ज्येवायचं. गाडी कवाची ?"

" दुपारीं येक वाजतांची."

" भ्येटल का ? "

" न भ्येटाया काय झालं ? "

" पर सोयर, ह्ये काई खरं झालं न्हाई पघा—"

" काय ? "

" अव न्हायला असतां निवान्तपनानं—"

" येकदां ठरल का – म्हंजी मंग यीन की ! आतां चलायचं पघा."

दोघे घरीं गेले. कसेबसे जेवले. धोंडी कुरकुरतच राहिला,

" ह्ये काई रितीच झालं न्हाई—"

" रितीच मागून करूं – ठेपशीर ! "

डोईवर पागोटं ठेवीत धोंडी सारजाला म्हणाला,

" आइकलं का ! मी वाइच लोनावळ्याला जाऊन येतों."

" लोनावळ्याला ? "

" व्हय. आल्यावर मंग सांगन समदं."

लोकल पकडायला दोघांना धांवपळच करावी लागली. मळवलीचा पोर्टर ओळखीचा होता. धोंडीला धांवतांना बघून तो तांबडं निशाण उंचावून म्हणाला,

" धांवूं नगा हवालदार ! गाडी जात न्हाई ! "

" पर तिकटं—"

" मी घेतों आनून. तुमी गाडींत बसायचं पघा."

हे दोघे गाडींत बसले. पोर्टरनं धांवत धांवत तिकिटं आणून दिलीं. गार्डनं विचारलं,

" कोण रे ? "

" ह्ये ? तुंगी गडाच हवालदार. लई दाना मानूस ! "

गाडी लोणावळ्याला पोंचली. हे दोघे घरांत शिरले, तेव्हां सरू कशिदा भरीत बसली होती. या दोघांना आंत येतांना पाहिलं – तशी पटकन् उठून ती घरांत गेली.

सतरंजी अंथरीत घारेदादा म्हणाला,

" बसायचं हवालदार ! "

हवालदार ? सरू चपापली. एकूण हा ओबडधोबड माणूस हवालदार आहे तर ! दूधवाल्याचा थोरला भाऊ – ज्याच्याविषयीं आपण बरंच ऐकलं आहे, ज्याच्या चांगुलपणाबद्दल दादा मोठ्या भाविकतेनं बोलतो, ज्याला सगळा पवनपट्टा अजून मान देतो, तो हवालदार !

उन्ह झालं होतं. वरचा पत्रा तापला होता. त्यामुळं घरांत बरंच उकडत होतं. क्षणभरच सरूनं विचार केला. मग या मोठ्या पाहुण्याचं आतिथ्य करायचा उपाय तिनं हुडकून काढला. एका वाटींत गूळ अन् थंड पाण्याचा तांब्या घेऊन ती बाहेर आली. पाहुण्यासमोर तें ठेवून ती पुनः आंत चालली.

धोंडी तहानला होता. तो पाणी मागणारच होता. तों न मागतां गूळ आणि स्वच्छ घासलेला शीतळ जळाचा तांब्या समोर पाहून तो एकदम प्रसन्न झाला ! तो मनांत म्हणाला,

" आमच्या घरीं ह्येच झालं असतं ! "

तो सरूकडे पाहूं लागला. घारेदादा बोलला,

" व्हय् हवालदार ! हीच माझी ल्येक. सरू—सरस्वती. बाये, पावन्यांना नमस्कार कर ! "

सरू आली. तिनं वान्या–बामनांसारखा वांकून तीनदां नमस्कार केला, अन् पुनः आंत चालली. धोंडीचं मन हरिखलं. त्यानं विचारलं,

" बाई, नांव काय तुजं ? "

मोठ्या मर्यादेनं पदर सांवरीत सरूनं उत्तर दिलं,

" सरस्वती. "

धोंडीनं क्षणभर सरूला न्याहाळून पाहिलं—ती पुनः आंत जाईतोंवर—

लगेच घारेदादानं तिच्या शिक्षणाचं वर्णन सुरू केलं. पण धोंडी जाग्यावर नव्हता !

त्याला आज पहाटे पडलेलं स्वप्न आठवलं. आजी दारांत उभी ठाकली होती. येऊं का विचारीत होती. असाच गोड, नितळ चेहरा. अशीच मर्यादा. असंच लाघव ! वा वा ! असंच !

अन् आवाज आठवला सारजेचा ! श्रद्धाशील सारजा. घराण्याशीं एकजीव झालेली. वेगळी एक तसूभरहि न आढळणारी ! घराण्याचं मोठेपण मोठ्या ताकतीनं वाहून नेणारी ! तिचा आवाज—

तो असाच होता. अगदीं असाच. गोड – बैलांच्या गळ्यांतल्या घंटांचा आवाज – खूप दुरून येणारा,–कानांना सुख देणारा – चरे न पाडणारा – मऊ – गोलाई असलेला—

घारेदादा बोलत होता. धोंडीचं लक्ष नव्हतं—

स्वप्नांत आलेल्या आजीचं रूप – सारजेचा आवाज—दोन्ही एका ठिकाणीं ! हें तर देवाचंच देणं !

तट्कन् धोंडीनं घारेदादाचा हात धरून दाबला, अन् भरल्या गळ्यानं बोलला,

“ सोयर ऽ ! ठरलं ह्ये ! ”

घारेदादा आपलंच दळण दळीत होता. त्याला कांहीं कळलं नाहीं. तो म्हणाला,

“ काय ? ”

धोंडी लगबगीनं उठला. पागोटं घालून तो बाहेर निघाला. घारेदादाला फार आश्चर्य वाटलं. तोहि घाईघाईनं उठला. तसाच धांवत त्यानं दारापर्यंत जात म्हटलं,

“ अव हवालदार ! ”

पण हवालदार कुठं जाग्यावर होता ? त्यानं धांवत एका हलवायाचं दुकान गांठलं. बोलला,

“ पेडे द्या ! ”

“ किती ? ”

“ द्या कितीबी ! ”

“ कितीबी ? ”

" व्हय; पावशेर–अच्छेर—"

हलवायानं अच्छेर पेढे बांधले. पैसे हलवायाच्या हातांत कोंबून धोंडी परत निघाला.

डोळ्यांत आंसवांच्या सरी वोळून आल्या होत्या. धोंडी त्यांना कसोशीनं मागं लोटीत होता.

शेवटीं पाहिजे होतं तें मिळालं,–घराण्याला साजेसं—

आतां घरण्याच्या आब्रूची चिंता मिटली—!

शब्दहि न बोलतां त्यानं चकित झालेल्या घारेदादाचा हात धरून ओढीत घरांत प्रवेश केला. सतरंजीवर बसत तो म्हणाला,

" सोयरऽ ! बोलवा माज्या आजीला ! "

" काय ? "

" माज्या सुनेला – तुमच्या लेकीला ! "

अन् मग कुठं घारेदादाच्या डोक्यांत प्रकाश पडला. तो हरखून म्हणाला,

" सरू, ये बाई भायेर ! "

सरू आली तीच मुळीं चिंचेच्या सरबताचे दोन पेले घेऊन.

धोंडी गद्गद स्वरानं म्हणाला,

" घ्ये माज्या आज्ये ! खाजं घ्ये ह्ये ! "

सरू मागंपुढं करूं लागली. घारेदादा घाईघाईनं म्हणाला,

" घ्ये पोरी ! घ्ये ! "

सरूनं तो पुडा घेतला. धोंडी बोलूं लागला,

" सोयरऽ ! मला माज्या पोराची मोठी चिंता व्हती. माजं हिरदय फाडून पायलं असतं तर तुमालाबी त्ये उमगलं असतं. वाडवडलांचं नांव – पर आतां काय दुख व्हायलं न्हाई. माजी आजीच येतीया पुन्ना माज्या घरीं ! आजच मला दिष्टान्त झाला. ये – माय ये ! आपला परपंच सांबाळ. बारदाना सांबाळ. तुजंच घर हाय त्ये. इत्कीं वर्सं तुजी वाट बघत हुतं हवालदाराचं घर. ये बाई ! पुन्ना ये ! आपलं घर उजळाया ये ! "

धोंडी बोलत होता. डोळ्यांत आंसवं दाटलीं होतीं. घारेदादा खूष

होऊन खिशांतली सुपारी काढून दातांखालीं कडकडा फोडीत होता. सरूला कांहीं यांतलं कळत होतं – कांहीं नव्हतं—

एक मात्र तिला वाटत होतं—

हा जाडा भरडा स्वर ऐकत रहावा !

*            *            *

लगीन मोठ्या धडाक्यानं झालं. सगळा पवनपट्टा धोंडीच्या दाराशीं हात धुवून गेला. वरात, गोंधळ, सगळं सायसंगीन पार पडलं. लग्नाच्या चार रात्री सगळा तुंगी गांव बत्त्यांच्या उजेडानं झगागत होता. हुसन्या शिकलगाराची म्हातारी त्याच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणाली,

" अरे बेटा हुसन्या, अपने हवालदारके ह्यां लगीन है. तवा कुचबी कर; चार रात व्हां उजाला होना चाय्ये ! इतने बरस उसका आन्न खाते आये—"

हुसन्यानं तें मानलं. लगीन उलगल्यावर तो बत्त्या बांधून परत निघाला; तेव्हां बत्त्यांचे पैसे घेईना ! शेवटीं धोंडीनं त्याच्यावर डोळे काढले, तेव्हां तो कुरकुरत म्हणाला,

" हवालदार ! बुड्ढी मुजे घुस्सा करेगी."

" अर चल घुस्सावाल्या ! हवालदारांची सांगी झाली म्हून सांग तिला."

आणि सरू घारे हवालदारीण होऊन तुंगींत शिरली !

एक मोठं चमत्कारिक झालं – ज्याच्याशीं लग्न झालं त्याच्याबद्दल तिच्या मनांत थोडीशी अढीच निर्माण झाली. आणि जो त्या लग्नांत हारपला होता, वारंवार डोळे पुशीत होता, धडपणं जेवत नव्हता, क्षणाची उसंत खात नव्हता, भाबडेपणानं कुणालाहि काय वाटेल तें देऊन टाकीत होता,— त्या ओबडधोबड माणसावर तिची भक्ति बसली !

दोन्ही घटनांना कारणं होतीं.

कोंडीनं पांघरलेल्या उपरण्याला शालूचं टोंक बांधलेली सरू डोळे पुशीत गुणे मास्तरांना नमस्कार करायला आली. गुणे मास्तर तर कावरेबावरे झाले होते. त्यांना आतां अंधार दिसत होता. आतां ते कुणाला रामायण शिकवतील ? कुणाला भारतांतल्या कथा सांगतील ? कुणाला हौसेनं गणित सोडवूं

लागतील ? सारा जन्म पोरांशीं झुंजतांना गेला. एकाहि गाढवानं नांव काढलं नाहीं. हीच एक पोर – हिच्याविषयीं खूप आशा होत्या. किती मनोरे रचले होते—किती संकल्प केले होते,—पण हीहि चालली !

ती निरोप घ्यायला आली आहे ! हवालदारीण व्हायला चालली आहे—

धडपडत, तोल सांवरीत गुणे उठले, आणि सरूनं त्यांच्या पायांवर डोकं ठेवण्याच्या आंत त्यांनींच तिला मिठी मारली ! धुमधुम रडूं लागले. जसं कांहीं त्यांनाच सासरीं जायचंय्.

बोलायचा कसोशीचा प्रयत्न करीत गुणे म्हणाले,

" सरू – मोठी हो बेटा ! हवालदार – धोंडी हवालदार फार मोठा माणूस ! त्याचं घर उजळ कर ! वाटत होतं, – इन्स्पेक्टर होशील— पण देवाच्या मनांत तुला—हवालदारीण करायचं होतं ! "

त्या मायलेंकरांची ती स्नेहमिठी पाहून सगळ्यांच्या डोळ्यांत पाणी आलं—

एक कोंडी मात्र जांभया देत उभा होता !

शेवटीं सरूनं नमस्कार केला. गुण्यांनीं तिच्या हातीं बनारसी जरीचा खण देत कोंडीला म्हटलं,

" हवालदार ! माझी पोर नाजुक आहे. नाजुक हातानं हिला वागवा बरं का ! "

तरी कोंडी खुंटासारखा उभा राहिला ! त्यानं कांहीं गुण्यांना नमस्कार केला नाहीं. तें सरूच्या मनाला भारी बोंचलं.

लगीन आटोपल्यावर नवरानवरी गडावरल्या महादेवाच्या दर्शनाला चाललीं. वाटेंत कड्याच्या पायऱ्या चढतांना सरूला ठेंच लागली. थोडं रक्त आलं. कोंडी तिच्याबरोबर होता. त्याच्यामागं त्याचे दूधवाले मित्र होते. त्यांतल्या एकानं थट्टा केली,

" कोंडीबा, येकदां पुन्याला जाऊन या."

" कशापाई ? "

" डोळं तपासाया ! ठयेचा लई लागत्यात ! "

कोंडी आणि त्याचे मित्र गदगदां हंसले. तो बाण सरूच्या जिव्हारीं लागला.

धोंडी आपल्याच तारेंत पुढं चालला होता. हंसू ऐकतांच त्यानं मागं पाहिलं. सरू लंगडत चालत होती. तो थबकला. घाबरून त्यानं विचारलं,

" का झालं ? "

त्याची मावसबहीण बरोबर होती. तिनं उत्तर दिलं,

" सूनबाईला ठ्याच लागली ! "

" आन् मग ल्येकहो, दात काडाया का झालं ? "

सगळे चपापून गप्प झाले. धांवत धोंडीनं कुठूनसा दगडीचा पाला आणला. त्याचा रस सरूच्या बोटावर घातला. टर्रदिशीं नव्या पागोट्याचा पदर फाडला, अन् लाजेनं नको नको म्हणत असतां तिच्या बोटाला पट्टी बांधली. मायेनं भारवलेल्या स्वरांत त्यानं विचारलं,

" व्हय सरूबाय, लई दुखतं का ? "

" नाहीं."

" न्हाई कसं ? दुखत असल."

तो सरळ मनाचा भाबडा माणूस क्षणभर विचार करून बोलून गेला,

" सरूबाय, न्हाई तर माज्या खांद्यावर बसती का ? "

सरूनं लाजून मान खालीं घातली. [illegible] धोंडीला हंसत बोलली,

" धोंडीदा, तुजं बोलनंबी जगायेगळंच हाय. न्हान हाय व्हय ती खांद्यावर बसाया ? "

" न्हान न्हाई तर काय ? माजं ल्येकरूं असतं तर हिच्यापरीस दोन वर्सांनीं सरसंच असतं. न्हानच हाय ती."

सरूला अवघड तर वाटलंच, पण तिचं मन सुखावलंहि. तें कावरंबावरं होऊन आसरा शोधीत होतं. तो त्याला लाभला.

* * *

सत्यनारायण करायचा ठरला. धोंडी जोश्याला बोलला,

" जोशीबावा, असा छान मुहुरत पघा—"

" अगदीं चांगला पाहतों. हा मार्गशीर्ष मास. म्हंजे पुरुषोत्तम मास. पौर्णिमा केव्हां आहे ! "

" पंचांगनांत पघा कीं—"

" आहे ना घरांत ? "

" हाय तर काय ! "

खुंटीला टांगलेलं पंचांग काढीत धोंडी म्हणाला,

" आज आठा दिसा असल—"

" हो, पण दोन आहेत."

जोश्यानं खिसा चापसला, अन् बोलला,

" अरे, चष्मा कुठं सांडला ? राहिला वाटतं घरीं ! "

" असं का ? ब ऽ रं ! ऱ्हाऊं द्या. सूनबाई पघल ! "

" नवी सून ! खरं का काय ? "

" तर ! अव सहावींत हुती ! "

" सहावी ! म्हणजे कांहीं फार नाहीं."

" फार न्हाई ! जोशीबावा, तुमी किती शिकला हुता ? "

" मी पांचवी —अहो पण ती जुनी पांचवी ! "

" ऱ्हाऊं द्या जोशीबावा ! अव आमच्या सूनबाईंच मास्तर सांगत हुत, लई हुशार पोरगी ! पर हातच्या काकनाला आरसा कशापाई ? सूनबाय ! "

सरू मर्यादेनं दारांत उभी राहिली. म्हणाली,

" मला हांक मारली ? "

" व्हय् व्हय् ! या हिकडं ! येकदां पुर्निमा कवा ती सांगा, अन् करा जोशीबावाच्या गर्वाचं हरन ! "

" मला कसं समजेल ? " असं पुटपुटत सरू समोर आली. पंचांग पाहून तिनं जोशीबुवांना विचारलं,

" पौर्णिमा दोन आहेत. पहिली हवी कीं दुसरी ? "

" दुसरी. पूजा सकाळीं करायची आहे."

" मग बुधवारीं आहे दुसरी."

धोंडीला जणूं एक लढाई मारल्याचा आनंद झाला ! जोशाकडे कृतार्थ मुद्रेनं पहात तो बोलला,

" का जोशीबावा ! हाय का ? "

" आहे बुवा ! "

कोंडी आणि सरू पूजेला बसलीं. जोशी कथा वाचूं लागला. कामाच्या घाईत असलेला धोंडी डोकावला, अन् जोशाला म्हणाला,

" जोशीबावा, आतां वाइच ब्येतानं ! ढेकण कोंण नगा सोडूं ! "

" कां हो ? "

" अव, तुमी काय वाचीतां त्ये समजनारं मानूस आलं आतां. लटपट चालायची न्हाई ! कोंडीला येक सबूदबी नसल समजत—पर धाकल्या हवालदारनीला समदं कळतंय्. तुमचं आपलं मराठी, संस्कुरित—पर आतां संस्कुरित पोथी वाचा ! "

" बरं ! संस्कृत तर संस्कृत. एकदा नैमिषारण्ये—"

* * *

लगीन झालं, तेवढे दिवस दुधाची व्यवस्था भिम्या पहायचा. गडबड आटोपली. संध्याकाळीं सरू भाकरी करीत बसली. सारजा कौतुकानं तिचा नीटसपणा न्याहाळीत कांदे चिरूं लागली. धूर झाला. सारजा म्हणाली,

" सूनबाय्, ती तिकडं फुकनी हाय, ती घ्या. आन् वाइच फुका चूल. धुरानं डोळं खराब होत्यात."

तेवढ्यांत कोंडी दारांत उभा राहिला. तो म्हणाला,

" व्हयन्ये, नव्या मानसाचीच काळजी करीत बसा ! हिकडं भुका लागल्यात—"

" व्हतंय—त्येच चाललंय्. आतां झुनका टाकीत्यें—तवर त्यो पाट घ्येऊन बसा."

कोंडी पाटावर बसत म्हणाला,

" व्हयन्ये, इचारलंस का ? "

" व्हय."

" मग का म्हनाला दादा ? "

" न्हाई म्हंगाल."

" अर पर का ? "

" त्ये म्हंगाल ऽ, हवालदाराच्या घरीं लगीन झालं. तवा पैका खरच व्हयाचा त्योबी घरान्याला सोबल तितलाच हवा."

" मंग या दुदाच्या पैक्याला का झालं? का कीड लागली? का घान येती?"

क्षणभर थांबून सारजा म्हणाली,

" भावजी, तुमाला त ठावं हाय्—"

" पर काय त्ये सांग की!"

" त्ये म्हंगालं ऽ, त्यो पैका गवळ्याच्या धंद्याचा क्येलेला हाय. मला न्हाई चालायचा."

कांहीं वेळानं कोंडी म्हणाला,

" मंग आतां मी काय करूं या दोन शंभर अन् पन्नास रुपयांचं?"

" तिकडं काईबी करा."

" तुला अंगटी—"

" ह्ये मला घरांतून भायेर काडतील!"

" बरं! नव्या मानसाला काईबाई—"

" भावजी, आइका माजं. त्येन्‌ला राग ईल असं काईबी करूं नका. न्हाऊं द्यात कीं पैस ऽ! म्हशींच म्हशीनाच व्हत्याल."

कोंडी तणतणा करीत म्हणाला,

" या दादाचं कायबी समजत न्हाई आपल्याला! हा कसला हट्ट?"

रात्रीं सरूनं सारजाच्या पायांच्या भेगांत वंगण भरीत मोठ्या संकोचानं विचारलं,

" बाई, एक विचारूं का?"

" इच्यार."

" पैशांचं काय चाललं होतं?"

अन् मग सारजेनं जेव्हां सगळं प्रकरण तिला सांगितलं, तेव्हां तिचं मन श्रद्धेनं भरून आलं. शेवटीं सारजा म्हणाली,

" सूनबाय, कवा कवा ह्ये का वागत्यात, काईबी समजत न्हाई."

सरू मनांत म्हणाली,

" पण मला समजतंय्. दादा फार मोठे आहेत!"

*　　*　　*

आपल्या या शिकलेल्या सुनेचं कौतुक कसं करावं तें कांहीं धोंडीला कळेना झालं. तो भाबडेपणानं असं कांहीं तरी करायचा कीं सरूला अगदीं अवघडल्यासारखं व्हायचं.

हरभरा पेरून तो जरा लवकरच शेतांतून परतत होता. वाण्याच्या दुकानांत तो तंबाखू घेण्यासाठीं उभा राहिला. वाणी नेहमीं इंग्रजी वर्तमानपत्रांची रद्दी आणायचा. पण या पाळीला कुठून कोण जाणे,—त्यानं रद्दींत मराठी वृत्तपत्रं आणलीं.

वाणी तंबाखू मोजीत म्हणाला,

" हवालदारदादा, लई लवकर हरभरा पेरून झाला ? "

" हुयालाच हवा. मागास झाला म्हंजी दहिवराची गंमत जाती."

" पर गांवाचा पेरा तर व्हायचाय्."

" का कराचं आपुन त्याला ? श्येतांकडं ध्यान न्हाई ! कवाबी प्येरायचं, कसं तरी उगवायचं ! येकदा कोंबडीवानी बी हिकडं तिकडं उडवून धिलं, का झाला प्येरा ! "

वाण्यानं रद्दींतलं वर्तमानपत्र काढलं, अन् फाडायला लागला. धोंडीचं लक्ष तिकडे गेलं. तो ओरडला,

" आर आर ! फाडूं नगस ! "

" का ? "

" आपलं बाळबोद हाय जनूं ? "

" व्हय्. मराठी हाय्."

" मंग तित्का त्यो समदा कागूद द्ये."

" कशाला ? "

" तुला ठाव न्हाई ? "

" काय ? "

" आमची सूनबाय—फडफडा वाचीती ! "

" खरं का काय ? "

" ये कीं रातीं घरी ! "

धोंडीनं तो वृत्तपत्राचा कागद घेतला, आणि नीट घडी करून पागोट्यांत ठेवून दिला. घरीं येतांना त्यानं आणखी दोघां-चौघांना बोलावलं. या सगळ्यांना आपल्या सुनेचं कौतुक दाखवून अगदीं चकित करायचं, असा बेत त्यानं योजला.

रात्रीं कचेरींत मंडळी जमली. चिलमीवर चिलमी फकफकूं लागल्या. धोंडी आंत डोकावून म्हणाला,

" आइकलं का ? "

सारजा दाराशीं आली.

" सूनबाई कुटं हाय ? "

" ती अन् भावजी दुदं काढीत्यात."

" तिला नको सांगू म्हनावं दुद काडाया. तुपला तूं कायबी का करीनास ! तिला बोलवा हिकडं ! "

सारजानं निरोप सांगितला, तेव्हां सरू म्हशीपुढं आंबोणाचं टोपलं धरून बसली होती. कोंडी म्हैस पान्हवीत असतां चोरून तिच्या तोंडाकडे बघत होता. निरोप ऐकून तो चरफडत म्हणाला,

" जा ! दादासायबांनीं बलिवलं हाय ! हुकूम मोडायचा न्हाई ! "

सरू डोईवरील पदर सरसा करीत दारांत येऊन उभी ठाकली. म्हणाली,

" मला बोलावलं—"

" व्हय् व्हय् ! या सूनबाय्. लाजूं नगस ! तुझी पंजीसासू नवऱ्याच्या घोड्याशीं घोडा दौडवून शिकारीला जात हुती. लाजायचं न्हाई. या. बसा थितं. ती चिमनी घ्या. आंगा आश्शी—! "

अन् मग डौलानं धोंडीनं पागोट्यांत जपून ठेवलेलें तें जुनं वृत्तपत्र काढलं. गांवांत रटफ वाचतां येणारा एक वाणी. त्याला धोंडीनं विचारलं,

" गनशा, तुजं लिवनं किती ? "

" माजं कुठलं आलंय् शिक्शेन ? घरच्या घरीं कुटं मुळाक्षर—कुटं कित्ता—"

" हात् तुज्या खळ्यांत कोंमडी हागली ! "

धोंडीची ही मोठी कौतुकाची शिवी. कधींमधींच ठेवणींतल्या बासना-

सारखी ती बाहेर पडायची. मंडळी गदगदां हांसली. फुशारकीनं तो कागद सरूपुढं देत धोंडी म्हणाला,

" हां सरूबाय ! वाचा ! "

तिनं संकोचानं तें वृत्तपत्र उलगडलं. धोंडी तिच्या नेमका समोर असल्यामुळं त्याला अक्षरं उलटीं दिसूं लागलीं. तो अवघडून म्हणाला,

" आं ? सरळ धरा कीं ! उलटं कशाला ? "

सरूच्या लक्षांत त्याची अडचण आली. ती हंसूं दाबीत म्हणाली,

" तुम्ही समोर बसले आहांत ना ? म्हणून तुम्हांला अक्षरं उलटीं दिसतात."

" असं व्हय् ? बरं बरं ! चालूं द्या आतां. फडाफडा वाचून दावा या समद्यानला."

सरूनं वाचायला प्रारंभ केला. युद्ध सुरू होतं, तेव्हांचा कुण्या तरी वृत्त-पत्राचा तो कागद होता. तारीख आणि नांव फाटलं होतं. लेखकानं युद्धाचं समालोचन करीत शेवटीं म्हटलं होतं,

> " याचं पर्यवसान कशांत होईल ? आज कांहींच निर्णय करतां येत नाहीं. रशियाच्या आन्तरिक सामर्थ्यावर तें अवलंबून आहे. पण आमचा होरा असा वाहतो, कीं शेवटीं रशिया जर्मनीला त्याच्या घरांतच कोंडून घालील—"

इथून पुढला मजकूर फाटला होता. सरू थांबली. वाचन सुरू असतां मोठ्या गर्वानं सगळ्यांच्या तोंडाकडे पहात असणारा धोंडी गचका बसून म्हणाला,

" का व सूनबाई ? "

" इथून पुढं फाटलाय् कागद."

" बरं बरं ! न्हाऊं द्या ! का केरबा ? आलं का ध्यानांत ? "

" काई आलं, काई न्हाई आलं—"

" का आलं ? सांगा बगूं ! "

" अस आलं, का जरमिळ आन् ह्यो रशिया, दोगांची चाललीया भाऊबंदी ! "

"बरं—"

"आन् ह्यो रशिया सायेब त्या जरमिळाला कवा तरी त्याच्या घरांत कोंडून घालनार!"

"म्हंजी कौरव–पांडवावानीच म्हना कीं!"

"आंगा तसंच!"

"पर हवालदार, ह्या दोगानला इक्कं भांडाया का झालं?"

हवालदारानं डोळे मिटून चिंतन केलं, मग सांगितलं,

"बाया बरं ह्या! बाया! शितामाईच्या पाई रामायेन घडलं, धुरपतीच्या-पाई महाभारत! जरमिळानं बाई पळवली आसल—"

हें म्हणणं त्या सगळ्यांना एकदम पटलं. सरू पदरानं तोंड झांकून हसूं लागली. धोंडी म्हणाला,

"सरूबाय्, आनीक न्हाई का काई कागदांत?"

"जाहिराती आहेत."

"मग दावा कीं वाचून! येक सबूद न्हाऊं द्येऊं नगा."

सरू जाहिराती वाचून दाखवूं लागली. दद्रुगजकेसरी, मुर्डीचं आर्यमहौषधालय, अमृतांजन,—झाडून सगळ्या जाहिराती संपल्या.

"झालं?"

"हो."

धोंडीनं गर्वानं सगळ्यांकडे पाहून म्हटलं,

"केरबा, इक्कं वय झालं माजं! मुंबई पाह्यली येकदां! पुनंबी पाह्यलं, पर आमच्या सरूबाय्वानी इद्वान बाई म्यां पघितली न्हाई!"

"न्हाई न्हाई! मीबी कोकनांत गेलों हुतो लोकर आनाया. म्हाडा-पर्यंत समदा मुलुख पघितला. पर असं श्यानं मानूस म्यां बी न्हाई पघितलं!"

माळ्याला ढोशीत वाणी म्हणाला,

"माळीदादा, आतां तुमी मागं न्हानार! बाया फुडं जानार!"

"जाऊं द्या!"

धोंडी कौतुकानं सरूकडे पहात म्हणाला,

" जा सूनबाई ! उटा आतां. लई वाचलं. आन् आइकलं का ? "

" काय ? "

" आतां उंद्यापून समदा गांव यील तुमच्यापाशीं ! ह्ये वाचून दावा, त्ये वाचून दावा ! पर कामाचं आसल तिक्कंच वाचून दावायचं. बिनकामाचं आसल तवा सांगायचं मला येळ न्हाई म्हनून ! समजलं का ? "

" हो. "

" खरं का न्हाई भुजाबा ? न्हाई तर माज्या सुनेला ईळभर समद्या गावाचंऽ कागुद वाचन्याम्होरं येळ मिळायचा न्हाई जेवायलाबी."

" व्हय् व्हय् ! लई वाचलं म्हंजी डोळंऽ बिघाडत्यात म्हन ! "

घाबरून धोंडी म्हणाला,

" आसं का ? सूनबाई, मंग आसं करायचं !—"

" काय ? "

" कुनी वाचून दावा म्हनून आला, का त्याला माज्याकड धाडायचा. मी सवता पघल. आन् लई जरवर असली तर तुमाला सांगल, बरं का ! "

" बरं."

सरू आंत गेली, तेव्हां तिच्या कानांवर धोंडीचे शब्द पडले,

" आर मर्दांनो ! भाशाबी कशी हाय ? सपष्ट ! सुद्द ! एक आक्षेर हिकड का तिकड व्हायाचं न्हाई ! "

" हवालदार, तुमचं घरानं लई भाग्याचं ! "

" आर त्याला पुन्याई लागती, पुन्याई ! "

दुसऱ्या दिवशीं पहाटे सरूनं धोंडीपुढं तोंड धुवायला गरम पाण्याचा तांब्या ठेवला अलीकडे धोंडीची मजा होती. सगळ्या स्वयंपाकाचा भार तर सरूनंच उचलला. पण धोंडीकडे ती विशेष लक्ष देऊं लागली. सारजेच्या लक्षांत जेव्हां हें आलं, तेव्हां ती हरखून दोन्ही हातांनीं सरूचं तोंड आपल्याकडे करीत म्हणाली होती,

" सूनबाई, तूं लई पुन्याची ! म्हनून असा थोरला दीर भ्येटला तुला."

धोंडीनं चूळ भरीत विचारलं,

" कोंडी उटला का ? "

" ते गेले कावड घेऊन."

पुन: ती तिथेंच घुटमळलेली पाहून धोंडीनं विचारलं,

" कां ? सांगायचं हाय का काई ? "

" हो - मला लाजल्यासारखं होतं—"

" कवा ? "

" माझ्याहून पुष्कळ शिकलेल्या बाया आहेत. आमच्या इन्स्पेक्टर बी. ए. बी. टी. आहेत—"

" म्हंजी तुज्यापरीस जास्ती ? "

" खूपच जास्ती."

" आर इच्या मारी ! पर त्यानला असं तुज्यावानी फडाफडा वाचतां येतंय् ? "

" माझ्याहून किती तरी चांगलं."

धोंडीचा यावर विश्वास बसला नाहीं. तो मान हालवीत म्हणाला,

" छा ! असं व्हायाचं न्हाई—"

" पण—"

" न्हाई न्हाई ! मीं बी खूप जग पघितलंय् ! पर तुज्यावानी वाचनार मला दुसरी कोनीबी दिसली न्हाई. तूं मला सांगतीस सूनबाय ? मी कवाबी इस्वास करायचा न्हाई."

धोंडीनं सारजेला हांक मारली, अन् आग्रहानं विचारलं,

" आइकलं का ? "

" का ? "

" सूनबाय् म्हनीती, का तिच्यापून लई शिकलेल्या बाया हायेत म्हन ! "

" व्हय सूनबाई ? "

" हो."

" आसल—"

धोंडी भडकला. तो मान हालवीत म्हणाला,

" काय आसल ? तुमाला काय बी समजत न्हाई ! उगा आपलं येड्या-वानी काय बी बोलावं ! माज्या सूनबायचं नांव सरसुती हाय. सरसुती

म्हंजी इच्चेची द्येवी ! माज्या सूनबाईवानी श्यानी बाई समद्या जगांत घावायची न्हाई."

धोंडी बडबडत शेतावर निघाला. किसन्याला बैल सोडतांना त्यानं विचारलं,

"हाय का — किसन्या !"

"का झालं ?"

"व्हय रे ? तुज्या धाकल्या वहिनीवानी श्यानी बाई जगांत कुठं भेटल का ?"

"न्हाई."

"पघा ! आइकलं का ? जरा वाईच श्यानपन शिका किसन्यापून !"

ते दोघे गेले, तेव्हां सारजा धुमधुम हंसत सरूला म्हणाली,

"आइकला का यांचा येडेपना ?"

सरू श्रद्धेनं विगलित होऊन मनांत म्हणाली,

"असा वेडेपणा लाभावा म्हणून मी जन्मभर तपश्चर्या करीन !"

* * *

हरभरा हुळ्यावर आला, सरूहि माघारपणाहून परतली.

पहाटे शेतांत निघाल्यावर धोंडी हांकारला,

"आइकलं का ?"

"का ?"

"सांजच्या पारीं सूनबाईला घेऊन या श्येतावर. आज हुळ्याचा ब्येत करायचा."

"समद्यांना बलिवलं का ? भुजाबा–केरबा—"

"न्हाई. समद्यांन्‌ला मंग बोलवायचं. ह्या आपल्या घरापुरता पेशल ब्येत. धाकल [illegible] तिकडच यायच आज."

"उशीर हुईल त्यान्‌ला."

"होऊं द्ये."

धोंडीनं कसं ऐकलं कोन जाणे, पण त्याला कळलं, कीं सरूला फुलं आवडतात. लगेच त्यानं गुलाबाचीं कलमं अन् शेवंतीचं रोप पैदा केलं. माळव्याच्या एका अंगाला त्यानं शेवंती लावली, अन् गुलाब टोंचला.

शेवंती मोकळा वारा अन् पाणी पिऊन धुमारली होती. गुलाबालाहि नव्या डिऱ्या फुटत होत्या.

मिरच्या उलगायला आल्या होत्या. अगदीं शेवटचा तोडा व्हायचा राहिला होता. मिरच्यांच्या शेजारीं लावलेले मुळे मात्र अगदीं बहरांत होते.

संध्याकाळीं धोंडीनं किसनाला सांगितलं,

" किसना, हरबरा काड जा."

" खायाला ? "

" न्हव येड्या, हुळ्याला ! "

खळ्याजवळ आगटी होती. धोंडीनं तुरकाट्या घेऊन जागा स्वच्छ लोटून काढली. किसना हरभरा घेऊन आला. कांहीं टहाळे धसमुसळेपणानं ओरबाडून त्यांच्या नुसत्या टिकऱ्याच आणल्या होत्या त्यानं. धोंडी गागला,

" किसन्या, तूं बिनाशेपटीचा गाडाव हायेस."

" का झालं ? "

" आर टाहाळा नीट न्हाई उपटतां येत ? आन्न हाय त्ये. द्येव हाय, नीट नीरातीनं काडावं. का निसती आपली पैलवानीच दावायची ? आन् ह्ये बग—"

" का ? "

" कुपाटीजवळ भ्या काट्या गोळा करून ठिवल्या हायेत, त्या आन."

सारजा अन् सरू आल्या. सरूनं शेतं पुष्कळ पाहिलीं होतीं. पण इथला नीटसपणा पाहून तिला वाटे, शेतांतच रहायला यावं. उन्हं पार कललीं होतीं. उतरत्या उन्हांत तुंगीगड, पलीकडले डोंगर, पवना, झाडझाडोरा, एकंदर सगळं दृश्य कसं सोनेरी रंगानं न्हात बसलं होतं. सरूला वाटलं, पटकन् या दृश्याचं चित्र काढावं ! ती हारपल्यासारखी तें सगळं पहात उभी राहिली.

धोंडीचं तिकडे लक्ष गेलं. तो म्हणाला,

" सरूताय् ! का झालं ? "

सरू भानावर आली. लाजून ती पुटपुटली,

" कांहीं नाहीं ! "

" बगत न्हावावसं वाटतय् ना? वाटायचच ! "

त्या दोघी खळ्याजवळ आल्या. धोंडी म्हणाला,

" आइकलं का? दोन-चार मुळऽ अन् काईबाई हिरव्या मिरच्या घावल्या तर पघा. घावल येकट दुकट."

सारजा अन् सरू दोघी मिरच्या अन् मुळे घेऊन आल्या. मुळे कळशीं-तल्या पाण्यानं धुवीत धोंडी म्हणाला,

" आइकलं का? "

" का? "

" मीं जवा सूनबायूला पहिल्यांदा पघितलं, तवा मला कसली सय झाली? "

" मला न्हाई ठावं."

" माज्या आजीची ! त्याच दिशीं सपनांत आली हुती. असलीच हुती माजी आजी ! आन् तिचं नांवबी सरसुती."

सरू काडीनं जमिनीवर रेघोट्या काढीत ऐकूं लागली,

" आन् सरूताय् बोलली – तवा कोन आटिवलं? "

" कोन? "

" तुमी."

" ह्ये आपलं काईतरीच— "

" न्हाई न्हाई ! काईतरीच न्हव ! " धोंडी आग्रहानं म्हणाला. सरूनं पट्कन् दृष्टि उचलून त्याच्याकडे पाहिलं. हाच आवाज ! ओबडधोबड, पण ऐकावासा वाटणारा, श्रद्धेनं पवित्र झालेला.

धोंडी कुटं तरी पहात म्हणाला,

" आर्जा ग्येली, तवा मी न्हान हुतो. पर मला आजीची सय येती अजून. सपष्ट आटिवती ! शेवटच्या खिनाला मला जवळ घ्येतलं,—जीव जायाचा, पुन्ना यायाचा. असं दोन-चार डाव झालं ! आजोबा म्हनाले, जीव आटक-तुया ! धाव्या अकराव्या दिशीं पिंडाला कावळा शिवना. आजोबांनीं हात जोडून सांगितलं, तुज्या श्येतांची म्हेनत मी माजा जीव लाऊन करीन ! तवा कुटं त्यो शिवला."

एक भला थोरला उसासा सोडून धोंडी म्हणाला,

"ती माजी आजी परत आलीया! आपल्या श्येताची वज कशी राखलीया नातवानं – त्ये पाह्याला! किती कष्ट करतोय्, किती खपतोय् यावर नजर ठेवाया!"

धोंडी उठून उभा राहिला. क्षणभर त्यानं दोन्ही हात कमरेवर ठेवून डोळे मिटले. अन् मग सरूला म्हणाला,

"या सरूताय्! माझ्या माग या!"

सरू मंत्रमुग्धासारखी उठली. ती त्याच्या मागोमाग चालूं लागली. सारजा त्या दोघांकडे वेड्यासारखी पहात बसून राहिली.

दोघं सादड्याच्या बांधावर जाऊन पोंचलीं. धोंडी भारावलेल्या आवाजांत बोलूं लागला. जसे कांहीं पावसाचे भले थोरले थेंब. वळवाचे. ऐन उन्हाळ्यांतले. सरू तृप्त मनानं ते शब्द पीत राहिली.

"सरूताय, त्यो पघा माळवा. ती तुमची ओकती. येकदां आल्तं मनांत हीर बांधावी असं. पर सांगू तुला?"

"सांगा."

"तूं इस्वास न्हाईंस करायची—"

"करीन."

"मला आतून कवा कवा वाटऽ आजी परत येनार! ती आल्यावर तिला ह्ये समदं जसं होतं तसं दावाया पाह्यजे, म्हनून म्या जसंच्या तसं राकलं! खरं वाटत तुला?"

"हो."

"वाटायचंच लोकांना न्हाई खरं वाटत. त्ये च्येष्टा करित्यात. म्हंत्यात — तोंडावर न्हाई म्हनत, मागं म्हंत्यात — का हवालदार येडा हाय! म्हना! पन् – पन् सरूबाय् माजी, तूं नग म्हनूस!"

"नाहीं म्हणायची!"

"कशी म्हनशील? न्हाई म्हनायचीस. तर ह्यो बाजरीचा तुकडा. त्ये भाताच चोंढऽ. ती पल्कड नागली. ती गुरचराईची सोंड. ह्ये समदं पघा. नीट राखलंय् का न्हाई त्ये सांगा. अन् समदं पास करून – ह्यो भार घ्या डोक्यावर! न्हाई म्हनूं नगा!"

सरूला ह्याचा अर्थ कळला नाहीं. ती धोंडीच्या तोंडाकडे पहात राहिली.

" घ्येतला म्हना सरूताय् ! करा आमाला मोकळं ! इच्चार हुता, धाकल्या भावाच्या गळ्यांत घालीन ह्ये समदं. अन् मंग आमी दोगं जाऊं ध्येवध्येव करायला. पर त्यानं मानलं न्हाई. कुळाला सोबत न्हाई त्ये करून बसला ! लई लागलं माज्या जिवाला ! मीं त्याचा पैका येकबी घ्येतला न्हाई. घ्येनार बी न्हाई. का घ्येनार न्हाई ? ठावं हाय ? "

" कां ? "

" त्यो पापाचा पैका हाय ! येक तर त्यो गोरसाचा पैका. आपल्या घरान्यांत गोरस कुनीं इकला न्हाई; – आन् आन्—"

" काय ? "

" त्यो पानी घालीतो दुदांत ! आयाबायांचीं ल्येकरं त्ये पानी दुद म्हनून पित्यात ! आर आर आर ! दुद म्हनून पानी पाजीतो न्हानग्या ल्येकरांना ! चांगलं न्हाई ह्ये !— चांगलं न्हाई ! "

सरूच्या मनाला वेदना असीम झाल्या. तिचं तोंड उतरलं. तें पाहून गडबडीनं धोंडी बोलला,

" न्हाई माज्या माय ! कष्टी होऊं नगस ! तूं कष्टी झालीस तर माज्या जिवाला डागन्या बसतील. सांग, तुला राग आला या ल्येकराचा ? चुकलं माजं काई ? "

सरूला काय वाटलं कोण जाणे. तिनं मनांत म्हटलं, या वेळीं लाजतां उपयोगाचं नाहीं. पटकन् वांकून तिनं धोंडीच्या पायांना हात लावला. धोंडी गदगदून डोळे पुशीत म्हणाला,

" असं न्हाई करायचं. उटा."

सरू डोळ्यांचीं टिपं चोरून पुशीत उभी राहिली. धोंडी म्हणाला,

" सरूमाय, किती बरं वाटलंय् म्हनून सांगूं ? आस वाटऽ, का या ल्येकराचं करनं मायला आवडतं का न्हाई ! पर त्ये तुमीं सरतं करून घ्येतलं, आतां मला गंगेंत आंगुळ केल्यावानी वाटलं. तर मग बोला ! "

" काय ? "

" ह्यो भार घ्येतला ना ? "

" कसला ? "

" या आपल्या बारदान्याचा ? "

" काय करायचं तें तुम्ही मला सांगा."

" दुसर कायबी करायचं न्हाई. निसतं घ्येतला म्हनायचं."

" मग काय होईल ? "

" मंग ? मंग मी दुप्पट जोरानं काम कराया लागन. माजं मन मला सांगल, का काळजी करू नगस. ह्यो समदा भार डोईवर घ्येतलेलं येक मानूस हाय. तुज्यावर काई न्हाई त्ये. तू निसते कष्ट कर. मंग बोला."

सरू घुटमळली. अत्यंत आग्रहाच्या स्वरांत धोंडी म्हणाला,

" म्हन, माय म्हन ! निसतं हो म्हन. हवालदार कुळाची कुळवंती हायेस. तुला काई ह्ये म्हननं जड जायाचं न्हाई."

" दादा, हा भार तुम्हांला इतका जड झाला ? "

" व्हय् माय. आतां वझं वाटाया लागलं."

क्षणभर विचार करून सरू म्हणाली,

" तर मग मीं घेतला ! "

हरखून जाऊन धोंडी म्हणाला,

" म्हना, कीं ह्यो समदा बारदाना माजा हाय—"

" दादा, हा बारदाना म्हणजे काय ? मला समजत नाहीं. पण मी तुमच्यावर विश्वास ठेवत्यें. तुम्ही सगळं चांगलं कराल. वाईट तुमच्या हातून व्हायचं नाहीं. नुसत्या माझ्या म्हणण्यानंच जर तुम्हाला बरं वाटत असेल तर म्हणत्यें मी —"

" म्हना ! म्हना ! "

" हें सगळं माझं आहे ! "

धोंडी हर्षानं नुसता फुलोरून निघाला. त्यानं आपल्या त्या लहानग्या भावजयीला पोटाशीं धरलं, अन् घाईघाईनं सारजेकडे जात तो गदगदल्या स्वरांत ओरडला,

" आइकलं का ? "

" काय ? "

" आतां मालकीनबाईच्या सांगींत वागायचं ! "

" म्हंजी ? "

" म्हंजी धाकल्या हवालदारीनबाईनं ह्ये समदं कत्राट गळ्यांत घ्येतलं ! "

सारजेला कांहीं समजलं नाहीं. समजण्याची जरूरहि नव्हती. ती पुटपुटली,

" तुमच्या हातून घडल् त्ये साजरंच घडल."

हुळा भाजतांना धोंडी कांहीं भानावर नव्हता. तो वारंवार बाहीला डोळे पुशीत मुक्ततेच्या आनंदांत डुंबत होता.

*　　　*　　　*

रिकाम्या घागरी खडाखडा वाजवीत घाटी चढतांना भिम्या म्हणाला,

" आइकलं का कोंडीबा ! "

" का ? "

" मी उंद्या पुन्याला जानार."

" कशाला र ? "

" चार पुतळ्या करून घालायच्या गाठल्यांत."

" कारभारनीच्या ? "

" व्हयू. तुजं काई गड्या खरं न्हाई–" आतां भिम्या कोंडीला अरे-तुरे करूं लागला होता.

" का र ? "

" आर इत्ता पैका येतोय दुदाचा ! बाईल भ्येटली नव्यानवलाची. पर तिच्या अंगावर येका पैचा जिन्नस काई घालतां येत न्हाई तुला."

" आर हाय् कीं तिच्या अंगावर बख्खळ ! "

" का का हाय ? "

" येळा, पुतळ्या, वाक्या, नथ, तोडऽ —"

" आर पर मर्दा – त्ये कुनाचं ? "

" कुनाचं ? "

" तुज्या दादाचं. तुज्या कमाईचं काय हाय त्यांत ? "

" आर दादा न्हाई म्हनीतो—"

" आन् तूं आइकतोस ? भल र गडी ! "

कोंडीच्या मनांत हें बरेच दिवस उमळत होतं. भिम्यानं आतां तें डिवचलं.

घरीं जाऊन कोंडीनं कावड ठेवली, अन् घाम पुशीत स्वयंपाकघराच्या उंबरठ्यांत येऊन बसला. सरूनं विचारलं,

" खायला आणूं ना ? "

" मला नग खायला ! "

सरू त्याच्या तोंडाकडे पहात उभी राहिली. मग तिनं विचारलं,

" आज बरं नाहीं ? "

" मला का धाड झालीया ? "

आवंढा गिळून सरू म्हणाली,

" तुम्ही हें असं कां बोलतां ? "

" कसं ? "

" कसं,–दादांशीं बोलतांना तर मीं तुम्हांला कधींच ऐकलं नाहीं."

" का बोलायच दादाशी ? त्यो हवालदारींतून खाली उतरलाच न्हाई अजून. येव्हारांत कस वागाव लागतं,–त्ये काई त्याला ठावं न्हाई."

आपल्या श्रद्धावस्तूवर केलेला आरोप सरूला सहन झाला नाहीं. तिनं विचारलं,

" एक विचारूं का ? "

" इच्यारा कीं ! "

" तुम्ही दुधांत पाणी मिसळतां ? "

" दादानं सांगितल असल ? "

" कोणी का सांगेना ! खरं आहे का हें ? "

कोंडी अवघड जागेंत कोंडल्यासारखा झाला. तो थोडा चिडलाहि. तावातावानं म्हणाला,

" तुमाला कुनी सांगितलं या पंचायती करायला ? "

" कुणीं सांगितलं ? कुणींहि नाहीं सांगितलं—"

तेवढयांत धोंडी घरीं आला. त्याला पहातांच कोंडीचा ताव विरला. तो मुकाट्यानं तिथून उठून म्हशींकडे गेला.

थोड्या वेळानं धोंडी कोठीच्या खोलींत चिलीम ओढीत बसला. तो मनांत विचार करूं लागला—

ही भिंत पडायला झाली. पलीकडे कललेली आहे. कुणा बापड्याच्या अंगावर पडेल. एवढं हें लग्नांत झालेलं कर्ज फिटलं कीं ही उतरून परत बांधली पाहिजे—

कोंडी कोठींत येऊन उभा राहिला. धोंडीला आश्चर्य वाटलं. त्यानं विचारलं,

" काय हाय कोंडीबा ! "

" न्हाई—"

" बोला कीं ! "

" मी उंद्या पुन्याला जाईन म्हंतों."

" जा कीं ! "

" पर—"

" का झालं ? "

" ह्यांच्या पुतळ्या वाढवायच्या म्हंतो—"

धोंडी जरा सरसावून बसला. त्यानं विचारलं,

" काय ? "

" तोळा दोन तोळ ऽ सोनं घ्येऊन—"

" न्हाई. अदुगर कर्ज फिटूं द्या."

" न्हव, माज्या पैशांतून—"

धोंडी कोंडीच्या तोंडाकडे पहात राहिला. नंतर तो गरजला,

" पुन्ना माज्याशीं यायेखीं बोलूं नगस ! "

" पर—"

" पर असत्यात कोमडीला."

" अन् मग माज्या पैक्याचं काय करूं ? "

"काय बी का करीनास तिकडं.-पवनेंत द्ये टाकून ! पान्याचा पैका पान्यांत ! "

कोंडी तावातावानं बाहेर पडला. एकदां त्याला वाटलं, म्हशी सोडाव्यात. त्यांच्या पाठीवर शिपट्या मारून त्यांना हाकून द्यावं. हे पैसे रस्त्यावर टाकून द्यावेत. अंगाला राख फांसावी. काशीला नाहीं तर रामेश्वरला निघून जावं ! पण—

पण सरू येईल का आपल्याबरोबर ? ती पाहिजे !

मग त्यानं हे सगळे बेत रहित केले. नोटा बाहेर काढल्या. त्या मोजल्या, पुनः मोजल्या तर कमी भरल्या. पुनः मोजल्या; तेव्हां जास्त भरल्या. तेव्हां त्याला बरं वाटलं.

मग त्यानं त्या एका गाडग्यांत ठेवल्या. झोपायच्या खोलींत एक लहानसा खड्डा केला. त्यांत तें गाडगं ठेवलं. वर एक परळ पालथा घातला, अन् त्यावर माती लोटून तो अंथरुणावर जाऊन पडला. एकदां त्यानं सरूला हालवून पाहिलं, पण ती झोंपली होती. मग तोहि थोडक्या वेळांत घोरूं लागला.

* * *

हरभऱ्याचा सर्वा वेंचायला सारजा गेली, तेव्हांच तिचं अंग मोडून आलं. दिवसभर तिनं अंगावर ताप काढला. संध्याकाळीं ती घरीं आली, तेव्हां सरूनं तिच्याकडे पाहिलं. घाबरून ती म्हणाली,

" हें काय बाई ? "

" का झालं ? "

" डोळे लाल कां ? बघूं ! ताप आहे कीं काय ? "

सरूचा हात भाजलाच. तिनं पटकन् धांवत अंथरूण घातलं, अन् सारजेला त्यावर नेऊन निजवलं. सारजा कुरकुरत होती,

" उगीच कौतुक करीती सूनबाई ! उगा थोडंसं अंग तावलंय्."

पण तिचं तिलाहि जाणवलं, कीं हें कांहीं सामान्य नाहीं.

कोंडी घरीं आला, तेव्हां त्याला सारजा झोंपलेली दिसली. तो घाबरून म्हणाला,

" व्हयन्ये, का झालं ? "

" काई न्हाई. उगीच थोडं—"

कोंडीनं तिच्या कपाळावर हात ठेवला, अन् आरडायला प्रारंभ केला,

" कुनी हाय का घरांत ? व्हयनी हिकडं आगीवानी तापून पडलीया ! अन् तिकडं—"

" भावजी, गागू नका उगीच. सूनबाईनंच मला बळंबळं झोपवलं. तीं सुठ उगाळीती—"

सरू उगाळलेली सुंठ घेऊन आली. सारजेच्या कपाळावर तिचा लेप घालीत सरू म्हणाली,

" बाई, आज रात्रीं कांहीं खाऊं नका."

कोंडी म्हणाला,

" का न्हाई खायाचं ? वाइच तिकाट कालवन करा, तोंड भाजल आसं. खाऊनश्येनी पांघरून घ्येऊन झोपून न्हाऊं द्ये. घाम ईल चपचपून. उंद्या जाईल दुखनं पळून."

" ताप आला म्हणजे पोटाला जरा विश्रान्ति द्यावी."

" त्ये तुमचं शिखलेलं पुस्तकी श्यानपन न्हाऊं द्या तिकडं ! " कोंडीला नेहमीं सरूचं शिकलेपण पोटांतून टोचायचं. त्याच्यावर आज सगळा ताव काढीत तो म्हणाला, " सांगतों तसलं करा."

घाबरून सारजा म्हणाली,

" भावजी, न्हाऊं द्या. मला भूकच न्हाई. आजचा दीस उपास करूं द्या."

तोंच धोंडी घरीं आला. हा गोंधळ पाहून तो म्हणाला,

" कसलं भांडान काढलंय् ? "

उत्तर दिलं सरूनं,

" बाईंना ताप आला आहे."

" लई आला का ? "

" जरा जास्तीच आहे."

" आर इच्या मारी ! दीसभर तर काई बोलली न्हाई ! "

धोंडी सारजेच्या जवळ येऊन बसला. कोंडी उठला, आणि वहाणा घालून बाहेर गेला. सारजेच्या अंगाला हात लावीत धोंडी बोलला,

" हाय वाइच गरम अंग. व्हईल उंद्याला कमी."

" इथं कुणी वैद्य नाहीं का ? "

" हाय की ! वानी येतोय् झाडपाल्याचं औशाद."

" त्यांना बोलवायचं होतं ! "

" सुनबाये, आइक माजं. आजचा दीस निघूं द्ये आंगावर दुखनं. उंद्याला कमी पडल् आपच."

पण सारजेचं हें बोलणं सरूला पटलं नाहीं. ती म्हणाली,

" दादा, पहा ना वाण्याला ! "

तोंवर बाहेर वहाणा वाजल्या. कोंडीच्या पाठोपाठ वाणी आंत आला. त्यानं विचारलं,

" सारजावैनी, का झालं ? "

धोंडीनं उत्तर दिलं,

" ताव आलाय्."

" असा कसा आला ताव ? बगूं ? "

वाण्यानं ताप पाहिला. मग सारजेची नाडी तपाशीत तो म्हणाला,

" काई कुपथ केलं आसल—"

" न्हाई र दादा ! निसती वांग्याची भाजी केल्ती, ती खाल्ली वाइच."

मग वाण्यानं वांग्याची निंदा करीत अकबर-बिरबलची गोष्ट ऐकवली, अन् म्हणाला,

" काई काळजी करूं नका. काढा देतों तित्का ध्या, उंद्याला पळतंय् दुखनं."

धोंडीनं विचारलं,

" कसला काढा ? "

वाणी डोळे मिचकावीत म्हणाला,

" उस्तादानं सांगून ठेवलंय्, कुनाला दावूं नकोस म्हनून ! "

कोंडीन वाण्याकडून काढ्याची पुडी आणली. सरूनं तो तयार केला, आणि तिनं अन् कोंडीनं मिळून बळंबळं सारजेला पाजला.

पण त्यांतला एक थेंब कांहीं पोटांत ठरला नाहीं. लगेच सगळं उलटून पडलं.

सारजा कण्हत म्हणाली,

" सुनबाय्, मला मुकाट पडूं द्ये रातभर. सकाळीं मी चांगली व्हईन."

रात्रभर सरू सारजेच्या पायथ्याशीं सजगपणं बसून होती. सारजेचा

येक क्षण कांहीं डोळा लागला नाहीं. सगळी रात्र तिनं कण्हत काढली. सरू वारंवार सारजेचं कपाळ चेपायची, हातपाय दाबायची. सारजा तिचा हात धरायची, तेव्हां मग सरू थांबायची.

धोंडी दोन-तीनदां रात्रींतून चौकशी करून गेला. सारजा त्याला म्हणाली,

" आइकलं का ?—"

" का म्हंता ? "

" तुमी झोपा मुकाट. दुखनं हरनाच्या पायानं येतं, आन् मुंगीच्या पायानं जातं. काई काळजी करूं नका तुमी."

पण सकाळीं धोंडीनं जेव्हां सारजेचा चेहरा पाहिला, तेव्हां त्याच्या छातींत धस्स् झालं ! अस्वस्थपणं तो सरूला म्हणाला,

" सुनबाय् ! "

' काय ? "

" मी वडगांवाला जाऊन जोशीबावाला ध्येऊन येतों. आमच्या घराऱ्याचा वैद त्योच हाय."

" कांहीं खाल्ल्याशिवाय—"

" अग आत्तां येतों मी—"

कोंडी त्या दिवशीं दूध घेऊन गेला नाहीं. त्यानं भिम्याला निरोप धाडून दुधाची व्यवस्था केली. सारजानं त्याला आपल्याजवळ बसविलं. त्याचा हात आपल्या हातांत घेऊन ती म्हणाली,

" भावजी, येक आइकाल का माजं ? "

" का ? "

" तुमी ह्यो दुदाचा धंदा बंद करा."

थोडा वेळ थांबून कोंडी बोलला,

" मग असंच का सांगीनास ?—"

" कसं ? "

" का तुपला तूं जा घरांतून म्हनून ! "

सारजानं हात सोडून दिला, अन् कूस बदलीत म्हणाली,

" विच्छा तुमची ! "

सारजेच्या दुखण्याची बातमी पट्टदिशीं गांवभर झाली. सगळ्या आयाबाया घरीं गोळा झाल्या. एकेक जण एकेक औषध सांगूं लागली.—

" सुनबाय्, वागाची चरबी हाय का ? "

" कशाला ? "

" समद्या आंगाला चोळा. आत्ता दरादरा घाम यील, आन् पळल ताव."

" आइका हिचं ! थोडी चरबी लागल का समद्या आंगाला चोळाया ? "

" दुखनंच आलं, मंग आनाया नग ? "

" त्ये काई न्हाई सुनबाई, मी सांगत्यें तुमाला—"

सरू तिच्या तोंडाकडे पहात राहिली. तिनं सांगितलं.

" मुरुडशिंगी हाय का ? ती मुरुडशिंगी आन् चिचचा पाला, आन् सादड्याची मुळी—"

" ए चिचचा पाला ! तुज्या आउशदानं काई व्हायाचं न्हाई."

" मंग ? "

" ह्ये हाये भायेरचं. सुनबाय, तुमी येक उलट्या पराची कोमडी पैदा करा."

" आन् तिचं का कराचं ? "

" ती उतरून चव्हाट्यावर न्हेऊन दनाक्दिशीं हापटायची."

" बयागय—! "

" व्हय ! पट्टदिशीं कोमडी मरती, आन दुखनकरी उटतो."

" व्हय सुनबाय्. येक निंबूबी ठिवा त्येच्या बरुबर चव्हाट्यावर."

" कशी ग तूं ? सांगायचं असल तर समदं सांगावं. स्येंदूर इसरलीस की ! "

" बयागय ! सयच न्हायली न्हाई. व्हय सुनबाई—"

हळूहळू बायांचा कोल्हाळ इतका वाढला, कीं आजारी माणसाचं भान कुणालाच राहिलं नाहीं. कोण कशी आजारी पडली, कोणाचं अंग किती सुजलं, कोण शेवटीं किती आचके देत होती—एक ना दोन. सारजा तरं तें कसंबस सहन करीत होती. पण सरूला तें सगळं असह्य झालं. ती उठली आणि काकुळतीनं म्हणाली,

" माळीणबाई, ऐकाल का माझं ? "

" काय ? "

" बाईंना रात्रभर झोंप नाहीं. त्यांना पडूं द्या ना जरा स्वस्थ—"

एवढा अपमान ? त्या बाया क्षणभर सरूच्या तोंडाकडे पहात राहिल्या, आणि मग माळीण उठून तोऱ्यांत म्हणाली,

" उटा ! उटा बायांनो ! धाकल्या हवालदारनीला तुमचं बोलनं गोड लाग ऽ ना ! "

पटापटा सगळ्याजणी उठल्या. सरूला अवघडल्यासारखं झालं. ती दाराशीं येऊन म्हणाली,

" माळीणबाई, तुम्हांला वाईट वाटलं—"

" कशाला बाई वाईट वाटल आमाला ? तुमी थोरामोठ्याच्या सुना-लेकी—"

तोंवर धोंडी अन जोशी आले, म्हणून त्या बाया लगेच चालत्या झाल्या. जोशी हातपाय धुवून सारजेजवळ गेला, अन् खालीं बसत म्हणाला,

" काय वहिनी ! काय बेत आहे ? "

" काई न्हाई बाबा ! "

" ताप केव्हां आला ? थंडी वाजली का ? "

" न्हाई. काल दुपारधरनं—"

" जीभ बघूं ! "

जोशानं तपासून कांहीं अनुमान ठरवलं. मग तो धोंडीला बाहेर घेऊन गेला.

" हें पहा हवालदार, काळजी करायचं कांहीं कारण नाहीं. पण जरा लक्ष ठेवलं पाहिजे."

" का ? "

" त्याचं असं आहे, रोग्याच्या नातलगाला सांगूं नये. पण तुम्हांला सांगायला हरकत नाहीं—"

" जोशीबावा, काय असल त्ये सांगा – मी हुशारींत राहीन."

" कस बोललांत ! असाच धीर ठेवायला हवा. हें पहा—" जोशानं थोडा बारीक आवाज करून म्हटलं. धोंडीनं कान देत एका हातानं छाती दाबीत विचारलं,

" का ? "

" ताप थोडा वेगळा दिसतोय. कांहीं औषध केलं होतं का ? "

" व्हय् – वान्याचं—"

" त्याचं कसलं कर्माचं औषध ! गेलं का पोटांत ? "

" न्हाई. उलटून पल्डं."

" तर मग बरं झालं. खायला काय दिलं होतं ? "

सरू जीव मुठींत धरून ऐकत दाराशीं उभी होती. तिनं पटकन् सांगितलं,

" रात्रीं कांहीं दिलं नव्हतं."

" हें फार बरं केलं. लोणावळ्याला मोसंबीं मिळतील. कोणी जाईल का ? "

" कोंडी जाईल की ! "

" धाडा. मी स्वतः राहातों. गोळ्या देतों. दुधांतून द्यायच्या. अन् माक्याच्या रसांतून मात्रा. दिवसांतून सहादां. माका मिळेल का ? "

" हाय आपल्या माळव्यांत."

" अन् सरूताई, आतां तुम्ही सारजावहिनीच्या नर्स. आलं का लक्षांत ? "

" हो."

कोंडी धांवत लोणावळ्याला गेला. धोंडीनं मळ्यांतून माका आणला. मात्रा उगाळून ती सरूनं चाटवली. सारजा हंसून म्हणाली,

" लईदी काई आलं नव्हतं."

" भोग असेल तो भोगला पाहिजे, नाहीं का ? " जोशी म्हणाला.

" व्हय्. आतां समद्यांना राबवून घेत्यें दोन-चार दीस."

सरूचं लक्ष दोन ठाईं वांटलं गेलं. घरांतलं तिनंच करायचं. म्हशींकडे तिनंच बघायचं. अन् तिचं मन मात्र सारजेच्या भोंवतालीं घोटाळत असायचं.

दुपारीं सारजेचा जरा डोळा लागल्यासारखा झाला. सरू तिच्या पायथ्याशींच हात उशाला घेऊन पडली. रात्रींच्या जागरणामुळें किंचित् झोंप लागली, तों तिला सारजेची हांक ऐकूं आली.

पटकन् सारजेच्या अंगावर वांकून तिनं विचारलं,

" मला म्हटलं कांहीं ! "

" व्हय् – पर वाइच पानी द्ये—"

पाणी देऊन सरू सारजेच्या जवळ बसली. तिनं सरूला थरथरत्या हातानं अधिकच जवळ ओढलं, आणि म्हणाली,

" पोरी, तुजा हात द्ये ! "

सरूनं आपला हात सारजेच्या हातीं दिला. तिनं तो छातीवर घट्ट धरून ठेवला. सरूला जाणवूं लागलं. आंत कांहीं तरी जोराची उलथापालथ होते आहे. कांहीं तरी आपल्या जाग्यावरून चळलं आहे. बाकी इंद्रियांची त्याला रोखून धरण्याची धडपड चालली आहे; पण तें कांहीं ऐकत नाहीं. अनावर झालं आहे. जणूं या कोंडींतून सुटूं पहातंय्. असं म्हणतंय्, कीं फार दिवस या पिंजऱ्यांत कोंडून राहिलों ! आतां थोडं बाहेर हिंडूं द्या – मोकळे-पणानं – स्वच्छंदानं !

सरूला जणूं तें जाणवलं. तिला भीति वाटली. ती सारजेला अधिकच बिलगून बसली. सारजा म्हणाली,

" कां ग बाई ? "

" कांहीं नाहीं—"

" ऐक, सांगत्यें. आइकशील का माजं ? "

" सांगा."

" पर करशील असं बोल."

" करीन."

" तुजा भरतार – न्हानपनापून म्यां वाढिवला त्याला. आजून त्याला काई समजत न्हाई. कवाकवा येड्यावानी काई तरी करतो. पर त्योबी या घरान्याचा पूत हाय. लई वाकडं वागनं व्हायाचं न्हाई त्याच्याकडनं, समजलं का ? "

" हो."

" तू लई श्यानी हायेस. पर कवाकवा मानसाचं डोस्कं तापतं. तर त्याला सांबाळून घ्ये."

" घेईन."

" आन् – आन्—"

" काय ? "

" कसं सांगू बाई तुला ? लई जड वाटतंय् ! छातीवर जसा डोंगर ठ्येवला हाय कुनी तरी—"

" सांगा – अगदीं मोकळेपणानं सांगा—"

सारजेला रडूं फुटलं. तिचे डोळे पदरानं पुशीत सरू म्हणाली,

" रडायचं काय बरं असं ? "

" न्हाई रडायची. सांगत्यें. ह्यांच्यावानी मानूस घावायचा न्हाई ! आपलं दुख कुनाला सांगायचे न्हाईत. समद्यांचं करतील, पर आपला बाना सोडायचे न्हाईत ! येकलेच सोशीत व्हातील, पोरी. मला वाइच श्यानपन असतं तुज्यावानी—"

" तुम्ही फार चांगल्या आहांत;—विठ्ठल-रखुमाईसारखा जोडा – तुम्ही रखुमाई आहांत बाई ! "

" व्हय्, पर करायची काय ती ? निसती दगडाची ! "

" असं कां बोलतां बाई ? "

" न्हाई बोलत. तर येक करशील ? "

" सांगा ना ! "

" ह्यान्ला सांबाळ."

" पण हें असं कां बोलतां ? "

" अदुगर सांबाळीन म्हन. मंग सांगत्यें."

" सांभाळीन."

" पोरी, माजं आनपानी सपलं—"

" बाई—"

" व्हय् पोरी, मोठ्यानं बोलूं नगस. आइकलं तर प्रान टाकतील. पर माजी ध्येई मला सांगती—"

सरूच्या जीवनांतला तो पहिलाच अनुभव ! मरण जवळ आलं असल्याचं एक माणूस एवढ्या संथपणानं सांगतंय् – एवढ्या सावधपणानं ! तिचं हृदय जणूं हाललं. सगळ्या जगाला दहावीस फेऱ्या घालून आलं, आणि पुनः जाग्यावर बसलं !

तिनं ठरवलं. हें एवढ्या शूरपणानं सांगितलं गेलं! तर तेवढ्याच ताकतीनं हा प्रसंग निभावून न्यायचा. अणूभरहि कमी पडतां उपयोगाचं नाहीं!

कोंडी धांवत हांफत मुंसुंबीं घेऊन आला. हातांनीं दाबूनच त्यांचा रस काढीत त्यानं वाहिनीला विचारलं,

"कसं का वाटतंय् व्हयन्ये ?"

"बरं वाटतंय्."

जोशानं स्वतः उपस्थित राहून मात्रा अन् गोळ्या दिल्या. रात्रीं तो तिथंच होता. तो, सरू, धोंडी, कोंडी — चौघांनींहि रात्र जागून काढली.

धोंडीनं जोशाला तर मारे प्रौढीनं सांगितलंन्. पण त्याचं हृदय धडधडूं लागलं. हातापायांना गोळे येऊं लागले. एकदां त्याला वाटलं, रानांत जावं, आणि खूप जोरानं ओरडावं. पण मग त्यानं मोठ्या ताकतीनं त्या भावनेला बांध घातला.

कोंडी बावरल्या वासरासारखा दर पांचदहा मिनिटांनीं वहिनीच्या अंगाला हात लावून पहायचा. ताप जसाचा तसाच! शेवटीं जोशी त्याला रागावला,

"कोंडीबा, असं रे काय करायचं वेड्या कोंकरासारखं? आजारी माणसाला त्रास होतो!"

हें ऐकलं, अन् विजेसारखा कोंडी तिथून बाहेर धांवला. कोठीच्या खोलींत कुणग्यांच्या सांपटींत तोंड खुपसून तो रडत राहिला.

दुसरा दिवस गेला. सारजा दिवसभर शुद्धीवर होती.—एवढा ताप असूनहि. ती रात्रहि गेली.

तिसऱ्या दिवशीं मात्र हातापायांच्या नाड्या सुटल्या!

जोशानं नाना परी केल्या. सुंठ उगाळून तो उगाळा सरूकडून चोळवला. शेवटीं कुठून तरी त्यानं दारूहि पैदा केली. ती चोळली. पण नाड्यांचा पत्ता नाहीं.

जेव्हां जोशाची मुद्रा उतरलेली पाहिली, तेव्हां धोंडीचं भान हरपलं! तो थरथरत म्हणाला,

"जोशीबावा, पायां पडतों, खरं सांगा!"

जोशानं उत्तर दिलं नाहीं!

कोंडीनं हें पाहिलं, तसा तो ताड्दिशीं उठला, आणि ओरडला,

"न्हाई! माज्या व्हयनीला मी मरूं द्यायचा न्हाई! व्हयन्ये, थांब, आत्तां आलों!

त्यानं भसाभसा उकरून गाडगं बाहेर काढलं—

नोटांना उधई लागून बहुधा सगळ्यांची माती झाली होती!

तो किंचाळला,

"व्हयन्ये! माजा पैका तूबी तुझ्या कामीं लागूं द्यायची न्हाईस? पर थांब! शिप्पत हाय माजी!"

चार-पांच दहाच्या नोटा शिल्लक होत्या, त्या उचलून कोंडी पिसाटा-सारखा धांवत सुटला मळवलीकडे.

जोशानं धोंडीला धरून बाहेर नेलं. त्याच्या पाठीवर हात फिरवीत तो म्हणाला,

"हवालदार! तुम्ही गडाचे धनी! शूरवीरांचे वंशज! धीर सोडतां असा?"

धोंडी तोंड झांकून गदगदून आक्रंदला,

"आयो!"

मग त्यानं तोंडावरले हात काढले. त्याची मुद्रा दगडी पुतळ्यासारखी दिसायला लागली. जणूं हरपत होतं तें अवसान त्यानं पुनः आणलं. ओढून आणलं. झगडून आणलं. आतां तो धोंडी नाहीं, हवालदार आहे. त्या शर्थीनं झुंजणाऱ्या घराण्याचा वंशज!

जोशाचा हात दाबून तो आंत गेला. सारजेजवळ बसत तो म्हणाला,

"आइकलं का?"

सारजेची वाणी अजूनहि स्वच्छ होती. ती म्हणाली,

"काय?"

"काई विच्छा असल तर सांगा."

"काई न्हाई!"

सारजेनं हंसून धोंडीकडे पाहिलं. त्यानं तिचा हात घेतला, आणि त्या

गरम हातावर आपले ओंठ टेकले. सरू शेजारीं बसली होती. तिला आवरेना झालं. फवाऱ्यासारख्या तिच्या डोळ्यांतून आंसवांच्या धारा चालल्या. मोठ्या मायेनं धोंडीनं तिला जवळ घेतलं, अन् म्हणाला,

" गप्प ! माय माझी ती ! रडत असत्यात का ? तू हवालदाराची सून ! "

आयाबाया जमल्या. शेतांतलीं कामं टाकून अवघे गडी धांवले. सगळा गांव दाराशीं गोळा झाला. कोणी कांहीं बोलेना. सगळं चिडीचूप.

केरबानं जोशाला विचारलं,

" जोशीबावा, काई आशा ? "

" शेवटपर्यंत आशा सोडायची नाहीं. पण आतां वैद्यो नारायणो हरिः ! "

दुपारीं भर उन्हांत कोंडी अन् एक पारशी डॉक्टर असे दोघे धांवत आले. धोंडीनं डॉक्टरला पाहिलं आणि तो मल्लखांबासारखा ताठ झाला !

त्यानं सरूला हांक मारून म्हटलं,

" सूनबाई, दागदरसायबान्ला पानी आना प्यायाला. किसना, केरबाच्या घोड्यावर खोगीर घालून आन त्यांच्यासाठीं."

कोंडी आश्चर्यानें म्हणाला,

" दादा, आतां तर आल्यात डागदरसाब. काई पाहानं – विंजेक्शन—"

" त्ये व्हायाचं न्हाई."

कोंडी हिरवापिवळा झाला. तो ओरडला,

" दादा !—चला डागदरसाब ! "

धोंडी दार अडवून उभा राहिला. शान्त स्वरांत तो म्हणाला,

" असा आरडा काय करावा कोंडीबा ? आपल्या घराण्याला ह्ये सोबत न्हाई. जात्या मानसाला गडबड न करतां जाऊं द्यावं—"

" दादा ! व्हयन्ये—" कोंडी दाराकडे धांवला अन् ओरडला,

" या तुमी डागदर—"

डॉक्टरला काय करावं तें कळेना झालं. तो म्हणाला,

" असा काय करते पावना ? अरे रोगी मानसाला बघेल, इंजेक्शन देल—"

" त्ये काई व्हायाचं न्हाई डागदरसाब ! "

कोंडी डोळे विस्फारून म्हणाला,

"अर पर का? म्या विंजेक्शन आनलींत–भारी भारी—"

धोंडी स्थिर दृष्टीनं त्याच्याकडे पहात म्हणाला,

"कोंडी, असं का करावं येड्यावानी? ती आतां घटकाभर ऱ्हायाची. जातांना कशाला टोचाटोची?"

"अर पर म्या आनलींत—"

घनगंभीर स्वरांत धोंडी बोलला,

"गवळ्याच्या पैक्याचीं—पान्याच्या पैक्याचीं? तीं विंजेक्शनं तुज्या व्हयनीला टोचाया निगालास तूं?"

"दादा—!"

"वरडूं नगस! पाप हाय त्ये! मी माज्या कारबारनीच्या अंगांत शेवटच्या घटकेला त्ये पाप टोंचूं द्यायचा ऱ्हाई. ल्येंकराबाळांना फसवून क्येलेल्या पैक्याचीं विंजेक्शनं—"

"दादा र! नग असा वैरी होऊंस—"

"येड्या, मी वैरी हुईन? तुजा? तुज्या व्हयनीचा? जलमभर जी गंगेपरमानं गांवावर आपल्या पदराचं पांघरून घालीत ऱ्हायली, तिच्या अंगांत मरतांना त्ये ईख टोचायचं? जा! ती बोलावीती तुला."

कोंडी आंत जाऊन वहिनीच्या अंगावर कोसळून ढोरासारखा रडूं लागला. ती खोल आवाजांत म्हणाली,

"भावजी, ल्येकरा माज्या, तसं का करायचं?"

"व्हयन्ये, तू सांग! दादाला बांदून घालीतों दावनीला! आन् तुला विंजेक्शन् घेऊन बरी करीतों—"

"आर द्येवा! भावजी, त्ये थोरल भाऊ हायेत तुमच! द्येवमानूस हाय त्ये! आइकऊं का?"

"काय म्हंतां?"

"गंगाजळ आना. मला खालीं घ्या."

जोशानं अन् केरबानं घोंगडी अंथरली. धोंडीनं एकट्यानं सारजेला तीवर उचलून ठेवलं. सरू धांवत देवघरांतून गंगाजळाची कुपी घेऊन आली. सारजा पुटपुटली,

" मांडी द्या ! "

दगडी पुतळ्यासारख्या धोंडीनं मांडी दिली. सारजेनं कोंडी अन् सरूला गंगाजळ घालायला खुणावलं. गंगाजळाचा घोट घेतला. ' येत्ये—' असं पुटपुटली, अन् त्या माउलीनं डोळे मिटले !

कोंडी गुरासारखा ओरडत उठला. इंजेक्शनची पेटी त्यानं पायरीवर हापटली. कांचांचे तुकडे चहूंकडे उडाले. पिसाटासारखा तो किंचाळला,

" दादा, अर चांडाळा ! तूं माजी व्हयनी मारलीस ! खून क्येलास तिचा ! "

* * *

पुढल्या महिन्यांत घटसर्पाची साथ येऊन चार म्हशी मेल्या.

कोंडी दादाशीं अत्यंत रुक्षपणानं वागूं लागला होता. सरू त्याची समजूत घालायचा कसोशीचा प्रयत्न करी. पण तो म्हणे,

" तुला ठावं न्हाई. दादानं मुद्दाम माजा दावा धरून त्यापाई व्हयनीला मारलं."

एका सायंकाळीं थकून गेलेला धोंडी चिलीम ओढीत बसला. कोंडी त्याच्या समोरच्या खांबाशीं उकिडवा बसत म्हणाला,

" दादा, म्हशी व्यायच्यात."

" व्या."

" कशा व्या ? पैका नग ? "

" लग्नांतलं रीन अजून फिटलं न्हाई. मी आतां पुन्ना रीन करायचा न्हाई."

" मंग धंदा बंद करायचा का ? "

" काय वाटल त्ये करा ! "

" मंग म्हनशील का इच्यारलं न्हाई."

" न्हाई म्हनायचा."

कोंडी रात्रीं वाडीवर गेला. भिम्या अन् दोघे-चौघे मारुतीच्या देवळांत गप्पा करीत बसले होते. कोंडीला पहातांच भिम्या ओरडला,

" या हवालदार ! "

" कशाचा हवालदार मर्दा ! बोलाचीच कढी बोलाचाच भात ! "

" का र ? "

" दादा म्हनाला, काईबी करा ! "

फडाफडा करीत मारुतीसमोरची चिमणी विझली. राम्या चिरचिरला,

" कसा गांव गाडाव हाये ! मारुतीम्होर दिवाबी लावीना धडपनी ! "

" असूं द्ये ! गावाला गाडाव म्हनतोस सुकाळीच्या, तर तू न्हाई न्हात काय गावांत ? "

" न्हाऊं द्या रे—! तर मंग हवालदार, आतां कसा ब्येत करायचा ? "

" मला त कायबी सुचना."

" आर सावकाराकड जाऊन करज का काडीनास ? "

" व्हय् र व्हय्. सोन्यावानी जिमीन हाय. दील कुनीबी हजारभर रक्कम."

" आर पर ह्याच्या नांवावर खुटं हाय जिमीन ! व्हय र कोंडी ? "

" न्हाई, दादाच्या नांवावर हाय समदी."

भिम्या खांबाला पाठ घाशीत म्हणाला,

" हवालदार ! "

" का झालं ? "

" येक युगत आठिवली."

" कंची ? "

" जमीन दादाची येकल्याची का दोगांची ? "

" दोगांचीच आसल अन्—"

" व्हय् व्हय्. दोगांचीच."

" अर त्याला बोलूं द्या की ! "

" व्हय्. दोगांची."

" मंग वाटनी करून मागा ! "

" व्हय र व्हय् ! "

" आर पर—"

" गप बस तूं ! मंग कसं हवालदार ? "

कोंडी कांहीं बोलेना. हें पाहून भिम्या म्हणाला,

" का र? अर जिमिनीचा मालक जसा दादा, तसा तूंबी. खरं का न्हाई?"

" व्हय् !"

" मंग त्याला म्हनावं, माझ्या वाट्याची जिमीन द्ये मला. मपली मी काईबी करीन. घान टाकीन न्हाईतर इकून टाकीन! खरं का न्हाई राम्या?"

" अर मस खरं असल, पर त्ये हवालदाराला पटलं पायजे ना?"

" पटल त काय झालं? का कोंडीबा?"

कोंडी तट्कन् उभा राहिला. आश्चर्यानं भिम्या म्हणाला,

" का र?"

" जातों घरीं. रातींचाच दादा घरीं भेटतो."

* * *

सारजेचं दुःख धोंडीनं बाहेर दिसूं दिलं नाहीं. लोकांना वाटे, एवढी बायको गेली, पण या माणसानं डोळ्यांतून टिपूसहि बाहेर काढलं नाहीं!

पण सरूला मात्र धोंडी फसवूं शकला नाहीं. एखादा त्याला आवडणारा पदार्थ करावा – लसणीची फोडणी दिलेलं वांग्याचं भरीत, मुगवड्या, अंबाडीची भाजी—पण धोंडी पोटभर न जेवतांच उठे. सरू विचारी,

" दादा, अंबाडीची भाजी साधली नाहीं—"

" न्हाई ग बाई! लई झकास झाली!"

" मग तुम्ही खात कां नाहीं?"

" खातों तर! इत्ती तर खाल्ली—"

" कुठं? कांहींसुद्धां खाल्ली नाहीं."

मग धोंडी सरूकडे पाहून हंसे. तिला त्या हंसण्याचंच मोठं भय वाटे. जणूं त्या हंसण्यावाटे त्याला असं म्हणायचं असे,

" पोरी, गाडीचं एक चाक निखळून पडलं—दुसरंहि त्याच वाटेवर आहे! खाण्यांतला आनंद गेला!"

म्हणून ती धोंडीला फार जपत असे.

कोंडी रात्रीं परतला, अन् त्यानं सरूला विचारलं,

" दादा झोपला का?"

त्याचा आवाज तिला नेहमींचा वाटला नाहीं. चकित होऊन ती हळू आवाजांत म्हणाली,

" नुकताच डोळा लागला आहे. कां ? "

कोंडीनं उत्तर दिलं नाहीं. सरूनं विचारलं,

" जेवायचं नाहीं का ? कुठं गेलां होतांत एवढा वेळपर्यंत ? "

" वाढा ! "

न बोलतां कोंडी जेवला, अन् हंतरुणावर जाऊन पडला.

दुसरे दिवशीं पहाटे धोंडी मशेरीनं दांत घाशीत होता. सरूनं पाण्याचा तांब्या आणून ठेवला अन् विचारलं,

" दादा, विसावण हवं का ? "

" नग ! "

कोंडी येऊन भिंतीशीं हात मागं घेऊन उभा राहिला. धोंडीनं त्याच्या कडे पाहिलं, अन् चुळा भरायला प्रारंभ करीत विचारलं,

" का व ? काई काम हाय् का ? "

कोंडी थोडा घुटमळला, अन् शेवटीं एकदम कसा तरी बोलून गेला,

" मला—"

" का ? "

" मला वाटनी पाह्यजे ! "

" का ? "

" वाटनी – श्येतांतली वाटनी पाह्यजे—"

सरू पटकन् दारांत येऊन उभी ठाकली. अत्यंत आश्चर्यानं ती त्याच्या- कडे पाहूं लागली.

धोंडीनं हातांतला तांब्या ठेवून दिला. त्याच्या तोंडाला अजून मशेरी तशीच राहिली होती. तरी तो उभा राहिला, आणि बोलला,

" का पायजे ? वाटनी ? "

" व्हय्."

" कशांतली ? "

" शेतांतली—"

" आनखी ? घरादाराची ? "
" तीबी—"
" हवालदारीचा हिस्सा ? "
" त्योबी—"
" गायरान ? "
" त्येबी—"
" आन् मळा ? "
" त्योबी—"

धोंडीची मुद्रा तांबडी–पिवळी झाली. सरूला त्याच्याकडे पाहून भय टलं. कांहीं क्षण धोंडी जागच्या जागींच थरथरला, आणि मग ज्वाला-ी फुटावा तसे ऊन्ह ऊन्ह शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडले.

" न्हाई घेत जा ! चंडाळा ! घेत न्हाई ! "

धोंडी सटपटला. पण धीर धरून त्यानं विचारलं,

" का ? "

धोंडी गरजला,

" का म्हनून इच्यारतोस ? आर कुलक्षेना ! कुटून दुर्बुद्दी आटवली ला ही ? आर आज इक्त्या पिढ्या नांदल्या हवालदाराच्या. कनी क्येली ती का वाटनी ? "

" आजवर नसल क्येली – पर—"

" आर गाडवा ! कालचा पोर तूं ! मला शिकवाया चाललास ? कुनीं रेवली र ही गोष्ट तुज्या मनांत ? कुना चंडाळानं ह्ये ईख प्येरलं ? "

" कुनी का प्येरीना—माजा हिस्सा मला घेऊन टाका."

" न्हाई घेत जा ! थू तुज्या जिन्यावर, मर्दा ! आर हवालदारांचं येस, न, मर्तब, समद्याचा पार इस्कोट करायला निगालास की र ! पवनपट्टा य म्हनल ? थुकल का न्हाईल ? "

" काई का म्हनीना ! वाडवडिलांच येस काई जेवाया घालीत न्हाई–"

धोंडीच्या वर्मी घाव बसला. त्याचा तोल हारपला. धांवत सरूनं

धरलं म्हणून बरं झालं. नाहीं तर तो भिंतीवरच आदळायचा. तसाच सांवरून तो गरजला,

" जा ! चालता हो – तोंड काळं कर ! तुजा मुकवटा पुन्ना माज्या दिष्टीसमोर आनूं नगस ! जा – जा म्हंतों ना ! "

त्याचा तो विकृत स्वर ऐकून कोंडीलाहि भय वाटलं. तो मुकाट्यानं चालता झाला. धोंडी कसाबसा उंबरठ्यावर जाऊन बसला, आणि तोंड गुडघ्यांत घालून मुसमुसून रडूं लागला !

सरूनं आतां काय करावं ! तिनं निर्णय घेतला. नवरा कुठं जात नाहीं. दादाला मात्र सांभाळायला पाहिजे या वेळीं. तिनं धोंडीचा दंड धरून म्हटलं,

" दादा, आंत चला."

मुकाट्यानं उठून धोंडी तिच्याबरोबर आंत गेला, आणि अस्फुट स्वरांत तिला म्हणाला,

" सरू ! कसं झालं ग ह्ये ! "

" तुम्ही शान्त व्हा दादा ! "

" शान्त व्हऊं ? अग कसा व्हऊं ? या गाडवाला कुन्या गोष्टीची कमी क्येली ? हाताचा पाळणा करून वाडिवला, आन् आतां चाण्डाळ म्हनीतो, वाटनी करून द्या ! अर ह्ये समदं कुनाचं हाय ! कुनासाटीं इत्के कष्ट करीतों मी ! माज्यासाटीं ? आतां काय व्हायचं हाय माजं ? ह्ये समदं तुजंच हाय म्हनावं. कशाची वांटनी ? घराची ? आर लाज कशी न्हाई वाटली ? "

सरूला रडूं आलं. ती धोंडीच्या पायांत डोकं खुपशीत म्हणाली,

" दादा ! पुरे झालं ! त्यांना समजलं नाहीं तुमचं मोठेपण. पण ते कधीं समजायचंहि नाहीं. तें असं उघड्यावर टाकूं नका दादा ! तें महागामोलाचं आहे. कुणाची दृष्ट लागेल."

धोंडी उगा राहिला. सरूनं त्याच्यापुढं गाईचं दूध आणून ठेवलं, आणि म्हणाली,

" घ्या तें दादा ! "

" नग आग्रे करूंस पोरी."

" माझ्यावर रागावलांत का दादा ? "

" नाई ग बाय माजी ती ! तुज्यावर राग करील त्याचं कंदीबी भलं व्हायाचं न्हाई."

" मग घ्या."

दूध घेऊन धोंडी शेतावर गेला. दिवसभर सरू कोंडीची वाट पहात राहिली.

* * *

त्या दिवशीं शनिवार होता. संध्याकाळीं किसना बैल घेऊन परतला. धोंडी म्हणाला,

" जा तूं म्होरं. मी येतों मांगून."

अष्टमीचा चन्द्र आकाशांत असा कासराभर वर चढून गेला होता. हळूहळू एका बाजूनं अंधारून आलं, अन् दुसऱ्या बाजूनं चांदण्यानं तुंगीगड उठून दिसायला लागला.

धोंडी बांधावर बसून राहिला. एकदां त्याला वाटलं,

कांहीं खरं नाहीं ! प्रपंच खोटा, शेतीभाती खोटी, हवालदारी खोटी. तुकारामबावानं म्हटलं तेंच खरं. ' नको नको मना गुंतूं मायाजाळीं ! ' कशासाठीं हा लटका पाश ? जावं असंच निघून पंढरीच्या वाटेनं. खांद्यावर पताक घ्यावी. हातांत टाळ घ्यावा. मुखांत नाम असावं. अन् तिथंच राहावं. परत येऊं नये. देव इतक्या जीवांना अन्न देतो. आपल्यालाहि देईल. संपेल जिणं आपलंहि—

अन् मग तिथंच – चोखोबाच्या जवळ — नामदेवाच्या पायरीजवळ — एका दिवशीं हळूच डोकं ठेवून डोळे मिटावेत. मग लोक येतील, कुठला म्हणून विचारतील. कोणी त्यांना सांगणार नाहीं. मग चार वारकरी गोळा होतील. उचलतील. भजन म्हणत चंद्रभागेवर नेतील. तिथं सद्गति देतील.

कुणाला माहीत असणार नाहीं. कोणी रडणार नाहीं. कोणी उसासे टाकणार नाहीं. कोणी डोळे पुसणार नाहीं—

त्याचं मन मोठं सुखावलं. बराच वेळ तो त्या तंद्रींत बसून राहिला. अचानक त्याची दृष्टि समोर गडाकडे गेली. कुणी जणूं म्हणालं,

"भले हवालदार !"

नाहीं नाहीं ! हें पूर्वजांच्या कीर्तीला शोभणारं नाहीं ! माझे पूर्वज लढून मेले. मीहि लढून मरेन. वांकायचा नाहीं. मोडेन,–पण मान झुकवायचा नाहीं !

अन् पटकन् त्याला वीर दिसला. तो घाईघाईनं उठून वीराकडे गेला. त्या समाधीवर डोकं टेकवून तो म्हणाला,

"न्हाई ! म्हातारबा, तुमचं रगत या काळींत सांडलं. माजंबी सांडूं द्या ! मी पळायचा न्हाई. हितंच माजीं हाडं पडतील !"

मग तो घराकडे निघाला.

* * *

इकडे पवनेच्या कांठावर एक नाटक घडत होतं. गजबजलेल्या कोंडीला लोटीत आपल्याबरोबर चालवीत भिम्या अन् त्याचे मैतर लपतछपत दहा एकरांकडे निघाले होते.

कोंडी आपल्याला सोडवीत म्हणत होता,

"अर न्हाई, भिम्या—"

"का न्हाई ? लई मातला हवालदार, कवा तरी हिसका दावाया पाह्यजे !"

"आर पर—"

"तू निसता आमच्यासंगट न्हा. आमी उरकीतो समदं."

* * *

गडावरून उतरणारा एक ओहोळ गांव आणि दहा एकर यांच्यामधून धांवायचा. पावसाळ्याचे चार दिवस सोडले, तर एऱ्हवीं तो कोरडाच असायचा. त्याच्या मधून रस्ता जात होता. दोन्ही अंगांना केकताडीचं बन माजलं होतं. ओहोळाच्या कांठावर एक महारुखाचं अन् दोन चार निंबाचीं झाडं उभीं होतीं. अष्टमीच्या चांदण्यानं तें सगळं जणूं अधिकच अंधकारलं होतं.

धोंडी निश्चिंतपणानं चालला. तो आपल्याच धुंदींत होता. देवळांत भजन सुरू झालं होतं, त्याच्या लयीबरोबर त्याच्या मनांतले विचार हेलकावे खात होते.

झाडांखालीं कुजबुज झाली,

" हूं ! हो म्होरं ! "

" ऊं हूं ! "

" आर हो मर्दा ! तू येकच तडाखा हान. मंग आमी हावोच की ! "

" ऊं हूं ! "

धोंडी चपापला. तो हांकारला,

" कोन ? "

गजबज झाली, अन् दोघेचौघे गडी हातांत काठ्या घेऊन एकाला लोटीत पुढं झाले.

धोंडीनं त्या अंधुक प्रकाशांतहि त्या एकाला ओळखलं—

तो कोंडी होता !

त्या दोघांचौघांनाहि धोंडीनं ओळखलं. तो अस्फुट स्वरांत म्हणाला,

" अर ह्ये काय करीतां ? "

तोंवर त्या गड्यांनीं कोंडीच्या हातांत काठी कोंबली. त्याचे हात धरून धोंडीच्या डोकींत एक तडाखा हाणला. नंतर त्याचा नाद सोडून पांच-सात रट्टे जागा सांपडली तिथं मारले, आणि ते कोंडीला ओढीत ओघळींत दिसेनासे झाले.

धोंडी आश्चर्याच्या धक्क्यानं एवढा स्तिमित झाला, कीं त्यांना वारण्या-पुरतंहि भान त्याच्याजवळ शिल्लक राहिलं नाहीं. थोड्या वेळानं तो ताळ्यावर आला, आणि भेसूर हंसून म्हणाला,

" आर आर आर ! इत्कीं खालीं गेलीं हीं मानसं ? "

रक्ताचा ओघळ त्याच्या डोक्यावरून कपाळावर आला, आणि तिथून खालीं गालावर थेंब टपटपूं लागले. धोंडीनं ते पुसून काढले आणि तो वाटेनं चालला.

सरू मोठ्या काळजींत पडली होती. आज दिवसभर कोंडीचा पत्ता नव्हता, आणि दादाहि घरीं आला नव्हता. नेहमीं तो याच सुमारास घरीं परते. पण आज सकाळीं तें प्रकरण झाल्यापासून सरूचं हृदय धडधडत होतं.

बाहेर पायतणं वाजलीं. सरूनं दादाची साद ओळखली. धोंडी मागल्या दारीं उभा राहून म्हणाला,

" सरूबाय् ! वाइच पानी आना."

" थांबा, गरम आणत्यें."

" न्हाई. थंडच आना."

" थंड कशाला दादा ? "

" ह्ये वाइच लागलं बाभळीचं बुरखुडं. रगात येतंय्."

सरू दिवा घेऊन धांवली. पहाते तों सगळं तोंड रक्तानं भरून गेलं होतं !

भयानं कोमेजून ती म्हणाली,

" कुठं लागलं दादा ? "

" वाटंत लागलं."

दुसऱ्या क्षणीं सरूंतली सेविका जागी झाली. तिनं दादाचा हात धरून त्याला पायरीवर बसवलं. ती पळत घरांतून हळद आणि फडकं घेऊन आली, आणि तिनं रक्त पुसून काढून जखमेवर हळद घातली.

" असं कसं लागलं दादा ? "

हंसून धोंडी म्हणाला,

" कसं लागलं ? आपल्या कर्मात लिवलं त्ये भोगावं लागतंय् "

" दादा ! "

" काय बाई ? "

" इतकी रात्र करीत जाऊं नका परतायला."

" का ग माय ? "

" मला — मला भीति वाटते ! "

तिनं जखम मजबूत बांधली, आणि म्हणाली,

" चला आतां घरांत. ऊन्ह ऊन्ह दूध नी भाकरी खा. निजतांना हळद दुधांत घालून देत्यें."

" माय, किती करशील ग ल्येकराचं ? "

" चला दादा तुम्ही."

सरूनं पाट मांडून धोंडीला बसवलं. तो जेवत असतां पटकन् ती त्याचं अंथरूण घालून आली. जेवण झाल्यावर तिनं त्याला धरून अंथरुणाकडे चालविलं. धोंडी म्हणाला,

" सरूबाय ! "

" काय दादा ! "

" माजी आजी मला अशीच न्हेऊन झोंपवायची. थोपटायची."

" मी थोपटतें; चला."

धोंडीला तिनं घोंगडी पांघरून कुशीवर निजविलं, आणि ती त्याला थोपटूं लागली. कांहीं वेळ धोंडीनं तें थोपटणं सहन केलं. पण मग त्याच्या तोंडून एक अस्पष्ट चीत्कार बाहेर पडला.

" काय झालं दादा ? "

" न्हाई—"

" इथंहि लागलं ? "

" वाइच—"

" बघूं ? "

" न्हाई ग ! काई न्हाई."

" माझी शपथ आहे दादा तुम्हांला. बघूं किती लागलं तें ? "

कुरकुरत धोंडी उठला. त्यानं पैरण काढली. सरूनं चिमणीच्या प्रकाशांत त्याची पाठ पाहिली. तिथं आणि दंडावर हिरवेनिळे दोनचार वळ उठले होते !

कांहीं क्षण सरू वेड्यासारखी त्या वळांकडे पहात राहिली. आणि मग तिनं गदगदून विचारलं,

" दादा ! मला फसवूं नका. कुणीं मारलं ? सांगा."

" न्हाई मारलं कुनी. बोलूं नगस मोठ्यानं. कुनी आइकल ! "

सरूच्या डोळ्यांतून क्रोध खालीं धावूं लागला. ती कणकणीत शब्दांत म्हणाली,

" नाहीं दादा ! मी तुम्हांला त्या मारणारांवर असं पांघरूण घालूं देणार नाहीं. तुम्हाला त्यांचीं नांवं सांगितलीं पाहिजेत ! "

" म्हंजी काय हुईल ? "

" काय होईल ? त्यांना कळेल, कीं त्यांनीं कुणाला मारलं आहे ! "

" नग – नग पोरी—"

" नाहीं दादा ! त्यांच्या हातांत बेड्या पाहिल्याशिवाय मला बरं वाटायचं नाहीं ! "

" न्हाई माय ! आपल्या कुळांत असं कंदी झालं न्हाई."

" दादा, तुम्ही नाहीं सांगत. नका सांगूं ! मी उद्यां ठाण्यावर जाऊन वर्दी देत्यें."

" अरे बाप ! इत्की गरम नग होऊंस सरूबाय ! अग, जीभ दातांखालीं घावली, त कुनी दात पाडाया का निघतं ? "

आतां कुठें सरूच्या डोक्यांत प्रकाश पडत चालला ! ती बावरलेल्या-भेदरलेल्या दृष्टीनं धोंडीकडे बघूं लागली. तिचा आवेश मावळला. हातांतली चिमणी थरथरूं लागली. अस्फुट स्वरांत तिनं धोंडीला विचारलं,

" दादा, माझी शपथ आहे तुम्हांला ! यांनीं तर नाहीं ना—"

अति स्नेहानं धोंडीनं तिच्या तोंडावर हात ठेवीत म्हटलं,

" गप, गप बाई ! मोठ्यानं बोलूं न्हाई ह्ये असलं ! "

केळ कापावी तशी सरू खालीं कोसळली. तिच्या हातांतली चिमणी घोंगडीवर पडली. पटकन् धोंडीनं ती उचलून एका बाजूला ठेवली आणि तो सरूच्या पाठीवरून हात फिरवूं लागला.

धरणीकंपानं जमीन हादरावी,–त्याप्रमाणं बराच वेळ सरू हादरत होती. केवढी लाज !

पण कांहीं वेळानं ती उठली. आंत जाऊन ती तोंड धुवून आली. धोंडीजवळ बसत ती म्हणाली,

" दादा, आतांपर्यंत कांहीं हट्ट केला नाहीं तुमच्याजवळ. आतां करत्यें."

" सांगा."

" केलं असं म्हणा."

" केलं ! बोल बाई."

" यांना क्षमा करा ! "

धोंडी प्रसन्न हंसूं हंसत म्हणाला,

" केलीच हाय बाई – तूं सांगायच्या आधींच—"

" नव्हे दादा ! ते माझे पति आहेत म्हणून नाहीं हें मागणं ! "

" मंग ? "

" बाईंनीं शेवटीं सांगितलंय् – त्यांना पश्चात्तापानं जळूं द्या. उजळून निघूं द्या ! हवालदाराच्या घराण्याला शोभतील असे होऊं द्या. त्यांचं त्यांना कळलं पाहिजे आपल्या कुळाचं थोरपण. तें शिक्षा करण्यांत नाहीं, क्षमा करण्यांत आहे, हें उमगूं द्या त्यांना. मग केव्हां का होईना, पण त्यांचं मन त्यांना सांगेल – सांगेल कीं—आपला दादा देवमाणूस होता ! "

धोंडीनं कांहीं न बोलतां सरूच्या डोक्यावर हात ठेवला.

* * *

तिसऱ्या रात्रीं मागलं दार खडखडवीत कोंडीनं हळू आवाजांत साद घातली,

" आइकलं का ? "

सरूला झोंप लागली नव्हती. लागणं शक्यहि नव्हतं. व्यथेनं जळून तिचा कोळसा व्हायला आला होता. तिन्ही दिवस तिनं घांसभर अन्न कांहीं खाल्लं नव्हतं. उठून तिनं मुकाट्यानं कडी काढली, आणि तशीच परत फिरली.

अस्ताव्यस्त फेट्याचा चोळामोळा करीत कोंडीनं चोरट्या आवाजांत विचारलं,

" दादा —! "

सरूनं चिमणीच्या उजेडांत निष्ठुरपणं त्याच्याकडे पहात उत्तर दिलं,

" बरे आहेत ! तुम्हीं केलेले घाव बुजताहेत ! "

गजबजून कोंडी कसा तरी पुटपुटला,

" म्यां न्हाई म्हटलं – पर – त्या—भिम्यानंच माज्या हातांत काठी धिली—"

" पुरे ! "

सरूनं जेवायला वाढलं. कोंडी अपराधी मनानं भकाभका घांसामागून घांस गिळूं लागला. सरूनं ओळखलं, तीन दिवसांत कोंडीनंहि कांहीं खाल्लं नसावं.

आवरासावर करून सरू मुकाट्यानं अंथरुणावर जाऊन पडली. कोंडीहि अपराधी मनानं घोंगडी डोक्यावरून घेऊन आडवा झाला.

मध्यरात्रीं त्यानं सरूला हालवून विचारलं,

" लई लागल का—"

" तुमच्या घावांचा तुम्हांला अंदाज नाहीं ? "

" लई वाईट काम घडलं हातून—पर मला वाटलं—"

" काय ? "

" दादा पोलिसांत ग्येला असल—"

" दादा ? "

कोंडी तट्कन् उभा राहिला. सरूनं आश्चर्यानं विचारलं,

" कुठं निघालांत ? "

" दादाला पगाया ! मला गोड वाट ना ग ! "

" ते झोंपले आहेत स्वस्थ. आतां सकाळीं—"

सरूनं दार अडवलेलं पाहून कोंडी हताशपणं खालीं बसला. ती म्हणाली,

" तुम्हीहि झोंपा आतां."

* * *

पहाटे उठून सरू कामाला लागली. धोंडीनं कोंडीच्या वहाणा पाहून सरूला विचारलं,

" सरूबाय, आल जनुं रातीं ? "

" हो "

धोंडीनं खोलीपाशीं जाऊन हांक घातली,

" कोंडीबा ! अव धाकल हवालदार ! "

कोंडी झडझडून उठला. जखमेवर पट्टी बांधलेला त्याचा दादा त्याला हांक मारीत असलेला त्यानं पाहिला. धांवत जाऊन त्यानं दादाच्या पायांना मिठी मारली. धोंडीनं त्याला उचलून छातीशीं धरलं, अन् म्हणाला,

" चला. जरा जाऊन यायचं हाय—"

" कुटं ? "

" तुमाला का करायचंय् ? "

न्याहारी झाल्यावर धोंडी कोंडीला घेऊन जेव्हां वडगांवच्या वाटेला लागला, तेव्हां कोंडीनं उभं राहून विचारलं,

" दादा, वडगांवला ? "

" व्हय्."

खळून कोंडी म्हणाला,

" न्हाई—मी न्हाई यायचा."

धोंडीनं त्याच्याकडे रोखून पाहिलं, आणि मग पुनः एकदां प्रसन्नपणं हंसला अन् म्हणाला,

" चल माज्या ल्येकरा ! चल असा. अडल्या गोऱ्ह्यावानी नग करूंस. काम हाय थितं."

" पर कंचं ? "

" हाय, थित गेल्यावर उमगल."

अन् वडगांवला वकिलाच्या घरीं जेव्हां धोंडीनं आपल्या नांवावरचं खातं बदलून तें कोंडीच्या नांवानं करून द्यायचं असं म्हटलं, तेव्हां कोंडी म्हणाला,

" न्हाई, न्हाई दादा—"

" आर गप्प—"

" न्हाई ! ह्ये काई खरं न्हाई ! मला नग ह्ये ! "

धोंडी गंभीर आवाजांत बोलूं लागला,

" कोंडीबा, लईदी म्यां भोगली हवालदारी. पर आतां वझं झालंय् तिचं. जड वाटाया लागलंय्. आज, उंद्या, परवां—कवा तरी ह्ये समदं तुमालाच पघाव लागनार. तवा मी हाय तंवरच ह्यो भार उचला. तुमाला काळजी नग.–माजी सून हाय, ती करील समदं. आन् निसतं नांव तुमचं घालीतों. बाकी समदं होतं तसंच चालायचं—माजं श्येतांत खपनं – अन् तुमचं लोनावळ्याच्या वाऱ्या करनं ! "

कागद करून धोंडीनं सगळं कोंडीच्या नांवावर केलं, अन् आपण मोकळा झाला – निःसंग ! वकील म्हणाला,

" हवालदार, फार घाई केलीत हो ? "

हंसून धोंडी म्हणाला,

" त्याचं अस हाय वकीलसाब, मानसाची बुद्दी फिराया येळ लागत न्हाई. दीस मावळून अंधार पडला न्हाई तंवरच घोड्यावरून खालीं उतरावं. न्हाई तर त्ये ख्येचाळाया लागतं ! "

ते दोघे स्टेशनावर पोंचले, तेव्हां धोंडीनं सांगितलं,

" आमचं तिकिट काडा लोनावळ्याचं."

" कशापाई ? "

" काम हाय. तुमी घरीं जा."

कोमेजलेला कोंडी घरीं परतला, अन् हात गुडघ्यांभोंवतीं गुंडाळून बसून राहिला. सरूनं विचारलं,

" कुठं गेलां होतांत ? "

" वडगावाला."

" कशाला ? "

रडवेल्या मुद्रेनं तिच्याकडे पहात कोंडी म्हणाला,

" कशाला ? दादानं लई वाईट क्येलं—"

" काय ? "

" समदं माज्या नांवानं करून धिलं ! "

" सगळं ? "

" व्हय्. त्यानं आपल्याला कायबी ठिवलं न्हाई."

सरू मुग्ध होऊन त्याच्याकडे पहात राहिली. अन् मग मृदु स्वरांत ती म्हणाली,

" दादा आहेत ते—सगळं कांहीं करूं शकतात ते ! कागद कुठं आहे ? "

" त्याच्यापाशींच हाय."

" एक तुम्हांला सांगून ठेवत्ये."

" का ? "

" हें बाहेर बोलायचं नाहीं."

" न्हाई—"

" अन् – अन् पुनः दादांच्या व्यवहारांत कांहीं ढवळाढवळ करायची नाहीं. चाललं आहे तसं चालूं द्यायचं. जर मला कांहीं ऐकूं आलं, तर—"

" तर काय ? "

सरूनं क्षणभर ओंठ दातांखालीं दाबून धरला, अन् मग म्हणाली,

" तर मी वीरासमोरच्या निंबोऱ्याला फांस घेऊन मरेन ! "

विजेसारखी ती आंत गेली.

संध्याकाळीं धोंडी लोणावळ्याहून परतला. पाय धुवायला पाणी देत सरूनं विचारलं,

" दादा, लोणावळ्याला कां गेलां होतांत ? "

" काम हुतं—"

" अन् – अन्—"

" का ? "

" कांहीं नाहीं ! "

आसवं लपवीत सरू पटकन् आंत गेली. धोंडीनं हांक मारली,

" कोंडीबा ! "

कोंडीबा दारांत येऊन उभा राहिला. त्याच्यापुढं धोतराच्या टोकांत बांधलेल्या नोटा ठेवीत धोंडी म्हणाला,

" पाचशें हायेत – मोजून घ्या. बगून आना म्हशी."

" दादा ! पुन्ना कर्ज—"

" तुमच्या जिमिनीवर न्हाई काडलं ! म्यां माज्या नांवावर आनलं. परमेशरी करून धिली — "

*   *   *

सरूनं हें सगळं लपवायचा आपल्याकडून खूप प्रयत्न केला. पण कशी कोण जाणे,–ही बातमी गांवभर झाली. कुणीं बरं म्हटलं, कुणीं वाईट. पण तें सगळं पाठीमागं. तोंडावर येऊन बोलायची कुणाची छाती झाली नाहीं.

वरवर दिसायला होतं तसं सुरू झालं. कोंडीनं भिम्याबरोबर चाकणच्या बाजाराला जाऊन दोन म्हशी आणल्या. त्याची लोणावळा-वारी सुरू झाली. पुनः पहिल्यापासून. रतीब तुटले. मग दूध कुठं तरी कसं तरी खपायचं. भाव कमी यायचा. मग पाणी घालून दूध वाढवायचं.

घरचं सगळं सरूनं सांभाळलं. म्हशींचा चंदीचारा, स्वैंपाक, धोंडीकडे लक्ष देणं.

धोंडीहि मुकाट्यानं शेतांत खपायचा. पूर्वी करी तेवढेच कष्ट. तेवढीच मेहनत. कणभर कमी नाहीं. पण अगदीं जवळ वावरणाऱ्या माणसाला वाटायचं, हा माणूस इथं असून इथं नाहीं.

सरूला तर हें माहीत झालंच होतं. पण किसनालाहि तें कळलं. एकदां तो सरूला बोलला,

" व्हयनीबाय ! "

" कां रे ? "

" येक सांगू का तुमाला ? "

" सांग कीं ! "

" दादा असं का व करीत्यात ? "

" काय केलं ? "

" का झालं,—का वाटकाच भार बांधल. येक त्यांनीं आन् येक म्या. पाऊस पडाया लागला. तवा म्या माजा भारा उचलला, आन् घराकड पळाया लागलो ! पायतान म्या नवंच घ्येतलं हुतं. चिकुल झाला म्हनून म्या त्ये काडून हातांत घ्येतलं."

" अरे पण रस्त्यांत कांटे होते ना ? "

" वख्खळ ! "

" अन् मग पायतण हातांतसं घेतलंस ? "

" मपल्याजवळ चिमटा आन नाचकण हाये ना ! काटऽमोडलऽतर काडून टाकता येत्याल. पर पायतान खराब झालं तर कसं ? "

" विद्वान् आहेस ! पण दादांचं काय ? "

" व्हय् ! त्ये न्हायलंच की ! तर म्या मागं वळून बगितलं. तवा का दिसलं ? "

" काय ? "

" दादा पावसांतच भिजत उभं व्हतऽ ! "

" खरं का काय ? "

" आईच्यान् ! कंधूळच उभ ऱ्हायल–ऱ्हायल ! आन् मंग भारा उचलून निगाल ऽ. "

हें एकदांच नव्हे. वारंवार होऊं लागलं.

त्या दिवशीं रपारपा चिखल तुडवीत सरू न्याहारीची पाटी घेऊन शेतांत पोंचली. सौंदडीखालीं एक कोप केली होती. त्या कोपींत भाकरीची पाटी ठेवून तिनं हांक मारली,

" दादा ऽ "

" आलों आलों ! "

धोंडी बांधावर गवत कापीत होता. त्यानं हातांतली मूठ तिथंच ठेवून दिली अन् इरलं सरसं करीत कोपीकडे आला. हंसत त्यानं विचारलं,

" वोहोळाला पानी व्हतं का ? "

" पाणी ? "

" व्हय. पहाटे पाऊस बरसला ना किल्ल्यावर ? "

" आज ? "

" व्हय ना ! "

" आज नाहीं दादा, काल—"

" काल का ? आर इच्या मारी ! म्या म्हटलं का आजच. व्हय व्हय, कालच बरं का ! "

सरूनं न्याहारी वाढली, अन् ती धोंडीकडे पहात बसून राहिली. तो जेवत होता. कसं तरी. मध्येंच तो थांबला, आणि गडाकडे बघत राहिला.

एक मिनिट,–दोन – तीन – चार.—शेवटीं सरूनं हांक मारली,

" दादा ! "

जणूं तो तंद्रींतून भानावर आला. म्हणाला,

" काय ग बाय ?

" कुणीकडे पहात होतां ? "

" कुनकड न्हाई."

" काय दिसलं तुम्हांला ? "

" काई न्हाई."

घरचं सगळं सरूनं सांभाळलं. म्हशींचा चंदीचारा, स्वैंपाक, धोंडीकडे लक्ष देणं.

धोंडीहि मुकाट्यानं शेतांत खपायचा. पूर्वी करी तेवढेच कष्ट. तेवढीच मेहनत. कणभर कमी नाहीं. पण अगदीं जवळ वावरणाऱ्या माणसाला वाटायचं, हा माणूस इथं असून इथं नाहीं.

सरूला तर हें माहीत झालंच होतं. पण किसनालाहि तें कळलं. एकदां तो सरूला बोलला,

" व्हयनीबाय ! "

" कां रे ? "

" येक सागूं का तुमाला ? "

" सांग कीं ! "

" दादा असं का व करीत्यात ? "

" काय केलं ? "

" का झालं,—का बाटकाच भार बांधल. येक त्यांनीं आन् येक म्या. पाऊस पडाया लागला. तवा म्या माजा भारा उचलला, आन् घराकड पळाया लागलो ! पायतान म्या नवंच घ्येतलं हुतं. चिकुल झाला म्हनून म्या त्ये काढून हातांत घ्येतलं."

" अरे पण रस्त्यांत कांटे होते ना ? "

" वख्खळ ! "

" अन् मग पायतण हातांतसं घेतलंस ? "

" मपल्याजवळ चिमटा आन नाचकण हाये ना ! काटऽमोडलऽतर काढून टाकता येत्याल. पर पायतान खराब झालं तर कसं ? "

" विद्वान् आहेस ! पण दादांचं काय ? "

" व्हय् ! त्ये ऱ्हायलंच की ! तर म्या मागं वळून बगितलं. तवा का दिसलं ? "

" काय ? "

" दादा पावसांतच भिजत उभं व्हत ऽ ! "

" खरं का काय ? "

" आईच्यान् ! केंधूळच उभ ऱ्हायल–ऱ्हायल ! आन् मंग भारा उचलून निगाल ऽ. "

हें एकदांच नव्हे. वारंवार होऊं लागलं.

त्या दिवशीं रपारपा चिखल तुडवीत सरू न्याहारीची पाटी घेऊन शेतांत पोंचली. सौंदडीखालीं एक कोप केली होती. त्या कोपींत भाकरीची पाटी ठेवून तिनं हांक मारली,

" दादा ऽ "

" आलों आलों ! "

धोंडी बांधावर गवत कापीत होता. त्यानं हातांतली मूठ तिथंच ठेवून दिली अन् इरलं सरसं करीत कोपीकडे आला. हंसत त्यानं विचारलं,

" वोहोळाला पानी व्हतं का ? "

" पाणी ? "

" व्हय. पहाटे पाऊस बरसला ना किल्ल्यावर ? "

" आज ? "

" व्हय ना ! "

" आज नाहीं दादा, काल—"

" काल का ? आर इच्या मारी ! म्या म्हटलं का आजच. व्हय व्हय, कालच बरं का ! "

सरूनं न्याहारी वाढली, अन् ती धोंडीकडे पहात बसून राहिली. तो जेवत होता. कसं तरी. मध्येंच तो थांबला, आणि गडाकडे बघत राहिला.

एक मिनिट,–दोन – तीन – चार.—शेवटीं सरूनं हांक मारली,

" दादा ! "

जणूं तो तंद्रींतून भानावर आला. म्हणाला,

" काय ग बाय ?

" कुणीकडे पहात होतां ? "

" कुनकड न्हाई. "

" काय दिसलं तुम्हांला ? "

" काई न्हाई. "

" मी सांगूं ? "

" सांग."

" बाई उभ्या राह्यल्या तुमच्यासमोर. त्यांच्या हातचं रुचकर जेवण—काय करूं दादा ? खूप धडपड करत्यें मी त्यांच्यासारखं यावं म्हणून. पण—"

घाईघाईनं धोंडी म्हणाला,

" न्हाई माज्या बाई ! लई झकास झालं शेंगांचं पिठलं ! वाढ वाइच."

पिठलं वाढून सरू म्हणाली,

" ही आपली माझी समजूत—"

" न्हाई न्हाई ! "

" मग काय दिसलं सांगा.—बाई दिसल्या ना ? "

धोंडीचा स्वर जड झाला. तो म्हणाला,

" न्हाई ! ती कशाला दिसल ? काई विच्छा न्हायली न्हाई तिची."

" मग कुणीकडे पहात होतां ? "

केंविलवाणं हंसूं हंसून धोंडी म्हणाला,

" असं काय करतीस बाई ? कुनकड पहात न्हवतों मी. काईबी दिसलं न्हाई मला. न्यारी करतोंय् न्हव का ! "

सरूनं ओळखलं. धोंडी कुठं तरी प्रवासाला निघाला आहे. कुठं तें त्याचं त्याला उमगलं नाहीं अजून. नुकता त्याचा प्रवास सुरू झाला आहे. प्रदेश अज्ञात आहे. मार्ग माहीत नाहीं. सखेसोबती कोणी नाहींत. तिथं अंधार आहे. त्यांत धोंडी चाचपडतो आहे.

त्याला सांभाळणं मोठं जोखमीचं काम आहे. पण तें केलं पाहिजे. कारण बाईंना मरतांना तसं वचन दिलं आहे. आणि—

दादावर तिची भक्ति जडली आहे ! रोज संध्याकाळीं या ओबडधोबड माणसाचे पाय धुवून वर चंदन माखावं असं तिला वाटतं. केवळ लाजेमुळंच ती तें करीत नाहीं.

पण दिवसेंदिवस सरूला प्रत्यय येऊं लागला,–ही जोखीम कांहीं सामान्य नाहीं !

एकदां बाजरीची सुडी रचून झाली. किसना पेंढ्या फेंकून फेंकून थकला

होता. तो भुकावला, म्हणून गांवांत जरा लवकर परतला. घरीं दडावून जेवून तो परत खळ्यावर आला. चांदणं पडलं होतं. सगळा कडेपठार जणूं दुधानं न्हायला बसला होता.

किसनाला खळ्यावर कोणी दिसलं नाहीं. त्याला वाटलं, धोंडीदादा जेवायला गेला असेल. त्यानं थोडा काडीकचरा आणला. जरा वेळ तो तापला, मग गाडीखालीं गोधडींत गुरफटून झोंपीं गेला.

अकराचा सुमार असेल, त्याला जाग आली. सरू अन् कोंडी कंदील घेऊन आलीं होतीं.

"का व व्हयनी ?"

चिंतित स्वरांत सरूनं विचारलं,

"दादा कुठं आहेत ?"

"मला न्हाई ठावं !"

"इथं किती वेळ होते ?"

"आमी दोघांनीं सुडी रचली का, मंग मी जेवाया आलों. परतून पाह्यलं तवा न्हवते. घरीं न्हाई आले ?"

"नाहीं रे !"

"आर इच्या मारी ! मग ग्येले खुटं ?"

सरू खळ्यावर बसून राहिली. कोंडी अन् किसना सगळा शिवार हिंडून आले. कोंडीनं हबकून नदीकिनारीं कुठं दादाचीं पायतणं दिसतात का म्हणून पाहिलं. पण कुठंहि नाहीं ! कांहींहि नाहीं. कसला मागमूसहि नाहीं.

सरूला एकटेपणाचं भान नव्हतं. भोंवतालच्या रातकिड्यांच्या किर-किरीची जाणीव नव्हती. कुठं तरी दूरवर कुत्रं केविलवाणे सूर काढीत होतं. तें तिच्या कानांत शिरलं नाहीं.

केवळ – दादा कुठं असतील ! तो थोर मनाचा हरपलेला माणूस कुठं असेल——!

मनांतल्या मनांत ती देवींदेवतांना लाख नवसहि बोलली.

तिला कंदील येतांना दिसला दुरून. तिनं प्राण डोळ्यांत आणून पाहिलं – केवळ दोघेच ! दोघेच परतत होते ! कोंडी अन् किसना.

कसं तरी तिनं विचारलं,

" नाहींत ना कुठं ? "

गाडीच्या जुवावर धप्पदिशीं बसत कोंडी म्हणाला,

" ऊंऽहूं ! "

मुकाट्यानं तिथं बसून राहिलीं. सरूच्या डोळ्यांत पाणीहि येईना. वेदनांनीं मन भाजतंय्, पण पाणी सुकून गेलंय्.

दुरून हांक आली,—

" कोंडीबा ! "

" वऽ ! "

केरबा अन् भुजाबा येत होते.

" घावल का ? "

" ऊंऽहूं ! "

" आर किल्ल्यावर पघितलं का ? "

कोंडी तट्कन् उठला. सरूहि उभी रहात म्हणाली,

" मी येतें ! "

" तुमी कशाला ? "

निग्रहानं ती बोलली,

" येतें."

भुजाबा, केरबा, कोंडी अन् सरू,–चौघं मरीआईचा माळ टाकून किल्ल्याच्या वाटेला लागलीं. कोणी कुणाशीं बोलत नव्हतं.

सरासर चढून त्यांनीं दरवाजा गांठला. भुजाबा म्हणाला,

" कोंडीबा, आमी दोग फुटक्या बुरजाकड पाहून येतों. तुमी म्हादेवाकड व्हा."

मधूनच ढग येत. चांदणं झाकून टाकीत. पुनः मोकळं करीत. त्यांच्या त्या लपंडावाकडे लक्ष देण्याइतकं भान कुणालाच नव्हतं. मोठ्या शर्थीनं तो

जिवावरचा कडा चढून सरू कोंडीबरोबर महादेवाच्या देवळांत पोंचली. आंत शिरतांना सरूचं हृदय कमालीचं धडधडत होतं—

तिला दिसलं, महादेवासमोरल्या भिंतीला डोकं टेकून धोंडी डोळे मिटून बसला होता !

यांची चाहूल लागतांच तो जागा होऊन बोलला,

" कोन हाय ? "

" मी – कोंडी—"

" आर ! कोंडीबा ? आन् संगट कोन त्ये ? "

सरूनं उत्तर दिलं नाहीं. ती पटकन् दादाजवळ बसली, आणि त्याच्या गुडघ्यावर डोकं ठेवून रडूं लागली. धोंडी अगदीं गोंधळून गेला. तो तिच्या डोक्यावर हात फिरवीत म्हणाला,

" उगा माजी बाय ती – रडूं न्हाई—"

कोंडी ओल्या स्वरांत म्हणाला,

" दादा ! "

" काय माज्या पुता ? "

" हितं का आलास ? "

" हितं ? मला ठावं न्हाई ! "

" ठावं न्हाई ? "

" न्हाई र गड्या ! "

" अजीच ठावं न्हाई ? "

" आईच्यान् ! अर सुडी रचली बाजरीची. बसलों खळ्यावर. किसना गांवांत ग्येला, तो यील – आन् मग आपुन जेवाया जाऊं म्हन्लं. पर कसा मी हितवर आलों, किती येळ झाला, कायबी ठावं न्हाई पघ ! "

सरू कशीबशी बोलली,

" दादा, एक आण वहा ! "

" कंची – माज्या बाई ? "

" या आपल्या लेकीला सोडून कुठं जाणार नाहीं म्हणा."

" पर ह्ये असं काई येडं वंगाळं झालं तर ? "

" नाहीं व्हायचं. माझी शपथ त्याच्या आड उभी राहील — म्हणा तसं ! "

" न्हाई जायचा बाई तुला सोडून."

" चला आतां."

" फाट झाली का ? "

" व्हायला आली."

तीं तिघं बाहेर पडलीं. तोंवर भुजाबा अन् केरबा धडपडत कडा चढत होते. कोंडी हाकारला,

" चढूं नका ! घावला दादा ! "

हीं माणसं त्यांच्यापर्यंत उतरलीं, तेव्हां केरबा म्हणाला—

" का व हवालदार ? "

धोंडी त्याच्याकडे पाहून हंसला. कोंडीनं त्याचा हात दाबून त्याला खुणावलं. तेव्हां ते दोघे गप्प राहिले. ही मंडळी गांवांत पोंचली, तोंवर कोंबडे आरवूं लागले होते.

* * *

फाल्गुनांत एका संध्याकाळीं पार अंधारूं लागेपर्यंत धोंडी ओकती चालवीत होता. भुजाबा गवताचा भारा घेऊन घराकडे चालला होता. त्यानं उटकवणं लावून त्यावर भारा टेकला, आणि हळी दिली,

" हवालदार ! चिलीम हाय का ? "

" हाय हाय. या ! "

भारा तिथंच ठेवून भुजाबा पाटाच्या कडेनं पाण्याचं धांवणं न्याहाळीत ओकतीजवळ पोंचला. तो बोलला,

" वा हवालदार ! वांगं कसलं हाय येकेक ! "

" काळ्या आईचं द्येनं हाय."

" आमची न्हाई व्हय ती आई ? आमाला कुटं द्येत न्हाई ? तुमालाच का देती ? "

" वाडवडलांची पुन्याई हाय."

" पुर झालं आतां. या."

" भरा तुमी चिलीम."

भुजाबानं चिलीम भरली. छापी पाटाच्या पाण्यांत भिजवीत तो म्हणाला,

" हवालदार, येक इच्यारूं का ? "

" इच्यारा कीं ! "

" राग न्हाई ना यायचा ? "

" आतां कुनावर रागवायचं भुजाबा ? आपलं मानूस ग्येलं ! "

" तसं का व ? आन् गांवाकडलं ध्यान तुमीं अज्जाच कमी क्येलं ? "

" तसं काई न्हाई—"

" न्हाई तर काय ? परवा मंडळी म्हनीत हुती, का आतां काई गोड वाटत न्हाई ! हवालदारांनीं वैराग ध्येतलं. ध्यान द्येत न्हाईत— "

धोंडी नुसताच हंसला.

" अन् आतां इत्ती ही म्हेनत कशासाटीं ? "

धोंडी गदगदा हांसत म्हणाला,

" तुमाला ठावं न्हाई भुजाबा. ह्ये शेत आमच्या बंदूचं. मी निसता हमाल. म्हेनत क्येली न्हाई तर तुमी म्हनाल, काढून घ्या ह्याला ! तवा क्येलं पायजे ! "

भुजाबा बोलला,

" धन्ये तुमी, आन् धन्ये तुमचा भाऊ ! "

धोंडीनं कांहीं न बोलतां चिलमींतून नुसताच फकाफका जाळ काढला. मग तो पुनः एकदां हंसला.

* * *

पुढलं वर्ष कांहीं पावसानं बरं दाखवलं नाहीं. कर्जहि फिटलं नाहीं. नुसतं व्याज पावतं झालं. रकम जशीच्या तशीच राहिली.

घरीं भले मोठाले दोन कुणगे होते. एकांत बाजरी सांठायची. दुसऱ्यांत भात. पण यंदां ते कुणगे भरले नाहींत.

पवनामायेनंहि हात आखडता घेतला. ओकतीच्या डोहांतलं पाणी उणावलं. धोंडीबा जिवापाड परिश्रम करतोय्. पण आभाळांतलं पाणी कमी पडलं,—तिथं परिश्रम कुठवर पुरे पडणार !

त्यांत सगळ्या पट्ट्यावर आणिक एक संकट कोसळलं. तुंगीला या संकटाची बातमी कळायच्या आंतच त्यानं गांव झपाटला.

पहाटेच येसकर धांवत हवालदाराच्या वाड्यावर आला, अन् त्यानं हांक घातली,

" हवालदार दादा ! "

धोंडीनं पुढं होत म्हटलं,

" का र ? "

" जव्हार ! दादा, माज्या घरीं चला वाइच—"

" कशाला ? आली का पुन्ना पोर भांडान घेऊन ? "

" न्हाई दादा ! माजा गोऱ्हा कसनुसं करतोय् ! "

धोंडी घाईघाईनं येसकराच्या दारीं गेला. नागडीं-उघडीं पोरं कडेवर खेमटून पोरी त्या गोऱ्ह्याकडे पहात उभ्या होत्या. येसकरीण पाय पसरून तोंडांतून नाना प्रकारचे रडण्याचे सूर काढीत होती.

गोऱ्ह्याचे डोळे तांबडे लाल होते. तो उगीचच हवेंत शिंगं मारीत होता. येसकर त्याच्याजवळ जातांच त्यानं त्याला जमिनीवर घोळसलं. कसंबसं धोंडीनं येसकराला ओढून बाजूला काढलं, तेवढ्यांत गोऱ्हा धाप्प्‌दिशीं जमिनीवर बसला. बसतां बसतां तो हगला. शेणाबरोबर रक्त बाहेर आलं. काळंनिळं.

धोंडीनं मोठ्या व्यथेनं गोऱ्ह्याच्या पाठीवर हात ठेवला. त्याची मुद्रा खर्रकन उतरली.

येसकर बोलला,

" का व दादा ? "

" ताव हाय अंगांत."

" मंग आतां कसं ? "

" कसं काय इच्यारीतोस ? गोऱ्ह्याला फाशी झाली ! "

भर्रदिशीं ती बातमी गांवभर पसरली. सगळे कपाळावर हात देऊन बसले.

येसकरानं आणखी एक शहाणपणा केला. गोऱ्हा मेल्यावर तो संध्याकाळ-पर्यंत हालवला नाहीं, तंवर गोऱ्हा खूप सुजला. ढुंगण मोठं झालं. त्यांतून शेणाबरोबर घाण बराच वेळपर्यंत बाहेर येत होती.

संध्याकाळीं महारवाड्यांतलीं आणखी चार जनावरं फाशीनं उडालीं. सकाळीं वणव्यासारखा रोग गांवभर पसरला. बैल, गोऱ्हे, गाई, कालवडी,— पार सगळीं जनावरं पटापट प्राण सोडायला लागलीं.

कोंडीनं म्हशी सोडल्या, अन् पिटाळीत लोणावळ्याला नेऊन घातल्या. पण बैल !

धोंडीनं आपल्या परीनं करायचं तें सगळं केलं. बैल अन् गाई त्यानं घरीं आणल्याच नाहींत. गांवच्या जनावरांत मिसळूं दिल्या नाहींत. उलगलेल्या खळ्यावर त्यानं खुंटे ठोकले, अन् तिथं गुरांची दावण बांधली.

एक म्हातारा गर्जन बैल अन् चार जवान बैल. सगळे घरच्या गाईचे. कान कळाशीदार. शिंगांना पितळी शेंब्या. या दिवसांत मारवेल खाऊन असे तयार व्हायचे कीं अंगावर निंबू ठरायचं नाहीं.

तीन गाई. तीनच कालवडी. त्यांतली एक नुकती पहिल्या माजावर आलेली. इकडे तिकडे ढुसण्या देत हिंडूं लागलेली. एका दुभत्या गाईखालीं कालवड. पांढरी शुभ्र. मोठाल्या काळ्या डोळ्यांची. स्वभावानं शान्त. आईसारखी.

एवढा धोंडीचा प्रपंच. त्याच्यावर त्याचा अपरंपार जीव. सगळीं गुरं त्यानं खळ्यावर ठेवलीं, अन् रात्रींचा झोंपायलाहि खळ्यावरच आला.

पण एवढा सगळा खटाटोप अगदीं व्यर्थ गेला !

एका रात्रींत म्हातारा बैल अन् कुशी गाय सोडून सगळी दावण उलगली. पटापट जनावरं भुईवर कोसळलीं, अन् हातपाय झाडून मेलीं. रात्रभर धोंडी कंदील जाळीत त्यांचीं मरणं पहात बसला होता ! हातीं कांहींहि नव्हतं !

एवढ्या जिवाभावानं वासरं जोपासलीं. बैल केले. कधीं काठी लावली नाहीं. कधीं आसुडाची वादी त्यांच्या पाठीवर उमटवली नाहीं. आधीं बैलांचं खाणं झाल्याशिवाय धोंडी पानावर बसला नाहीं. दर आठव्या दिवशीं त्यांना आंघोळ. अंगावर एक गोचीड नाहीं, कीं गोमाशी नाहीं.

ते बैल पटापट चालते झाले !

पण आश्चर्य ! धोंडीच्या डोळ्यांतून पाणी कांहीं आलं नाहीं ! नुसता साक्षीदारासारखा कंदील घेऊन बसलेला.

दिवस निघाल्यावर किसना आला. तो तीं सुजलेलीं गुरं पाहून हबकला. पण धोंडी हंसून त्याला म्हणाला,

" गड्या किसना, येसकराला म्हनावं तुला बलिवलंय्."

येसकर आला, तोहि तोंडांत पागोट्याचा पदर कोंबून उभा राहिला. मग बोलला,

" दादा ! "

" का र ? "

" कसं झालं ह्ये ? "

" सगळ्या गांवाचं झालं, तसं आपलं झालं ! "

" पार उन्हाळा झाला कीं ! "

" द्येवाची विच्छा ! "

" आतां श्येती कशी व्हायाची ? "

" व्हईल कशी तरी ! "

" अव पर—"

" न्हाई सका. समद्या पवनपट्ट्यावरच ही सक्रात हाय. पवनामाय रागावली, त्याला आपुन काय करनार ? आता ह्ये उचलायचं बगा."

संध्याकाळीं कुशीनंहि तीच वाट धरली. राहिला एकटा गर्जन !

* * *

पण नांगरणी तर झाली पाहिजे.

सांथ ओसरल्यावर भुजाबानं चाकणच्या बाजारांतून एक बैल आणला. एक त्याचा गोऱ्हा वांचला होता. त्यानं कशीबशी जुपी केली. केरबानं बारामतीच्या अंगाला जाऊन त्याच्या सोयऱ्याकडून कामापुरती बैलजोडी आणली. असंच कुणीं कांहीं केलं – कुणीं कांहीं.

धोंडीनं मात्र कांहींच केलं नाहीं. रोज तो शेतावर जायचा आणि बसून राह्यचा. सरूनं कांहीं विचारलं तर नुसता हंसायचा.

संध्याकाळीं धोंडी जेवत होता. भाकरी उरपतीत सरू म्हणाली,

" दादा ! "

" काय ग माय ! "

" मी उद्यां जात्यें—मी अन् किसना."

" कुटं ?

" बिबेडोळला."

" कुनाकडं ? "

" माझ्या काकांकडे. चार दिवसांसाठीं त्यांची बैलजोडी घेऊन येत्यें."

" न्हाई—"

" नाहीं तर काय ? नांगरणी व्हायला नको ? "

" व्हय पर—"

" नाहीं दादा. मला उमगतंय्. आतां कर्ज काढायला मी सांगायची नाहीं. तुम्हांला सावकाराच्या दारांत उभं करण्यापेक्षां मी मरण पत्करीन. एक विचार आला होता—"

" कुंचा ? "

" दोन एकर विकून टाकायला सांगावं तुम्हांला—"

" सरूताय्—"

" नाहीं. मला ठाऊक आहे. प्राणापलीकडे प्रेम आहे तुमचं जमिनीवर. हें तुमच्या हातून व्हायचं नाहीं. तेव्हां शेवटीं मीं हा उपाय काढला आहे. उद्यां जाईन – तेरवां परतूं आम्ही."

" न्हाई माजी बाई—"

" कां ? "

" असं सोयऱ्याच्या दारीं उभं ठाकनं हवालदाराच्या घरान्याला सोबत न्हाई. तू हवालदाराची सून. झोळी घेऊन लोकांच्या दारीं अलख गाजिवनार ? छा छा ! "

सरू चकित झाली. दादाच्या मर्यादा एवढ्या उंच आहेत हें तिला आज कळलं. तिनं विचारलं,

" मग मेहनत कशी व्हायची ? "

" व्हईल. उंद्यापून व्हईल. उंद्या न्हारी आनायची श्येतांत."

सकाळीं कोंडी दूध घेऊन निघाला. सरूनं रात्रींची हकीकत त्याला सांगितली. तो म्हणाला,

" तू जान अन् दादा जान ! "

" म्हणजे काय ? "

" म्हंजी दादाचं वागनं काई आपल्याला उमगत न्हाई. कंदीं समजतं, पर तसं वागतां येत न्हाई. तुला दादाची इच्या पाट हाय. त्यो तुज्या सांगी-म्होरं जात न्हाई. तवा तुमी दोगं काईबी करा."

कोंडी गेला, अन् थोड्या वेळानं सरू डोईवर न्याहारीची टोपली घेऊन शेतावर गेली.

ती आश्चर्यानं अगदीं थक्क झाली !

धोंडी अन् किसना, दोघे कुदळींनीं शेत उकरीत होते !

ती घाईघाईनं त्यांच्याजवळ गेली, अन् गजबजून म्हणाली,

" दादा, काय हें ? "

धोंडीनं अंगांतलं कुडतं काढलं होतं. त्याच्या त्या बांधीव शरीराची परवड स्पष्ट दिसत होती. एवढा खाल्लाप्यायला देह; पण आतां बरगडी न् बरगडी जणूं उमळून वर येऊं पहात होती. पण त्याच्यांतली रीस अजून हारपली नव्हती. पीळ अजून मोडला नव्हता.

धोंडी थांबला. थुकीनं हात ओले करीत त्यानं पुनः कुदळ उचलली, आणि ती जमिनींत खोलवर टाकीत तो हंसून बोलला,

" बाई माजी, ही काळीची पुंजा हाय्. असं खपावं लागतं, तवा काळी परसन्न होती."

सरूच्यानं पुढं कांहीं बोलवलं नाहीं. ती टुकुटुकु त्याच्याकडे पहात राहिली. वारंवार कपाळावरचा घाम निरपीत धोंडी भसाभस जमीन उकरीत होता.

पलीकडलं शेत आरज्या माळ्याचं होतं. तो नुकता नांगराची जुपी करायला शेतांत आला होता. त्यानं धोंडीचं कवतुक न्याहाळलं, अन् तो त्याच्याजवळ येऊन म्हणाला,

" धोंडीदा ! दोग मिळून किती दिसांत खननार श्यात ? "

" लागनात का कितीबी ! अर खालीं कोकनांत न्हाई का कुनबी जातीनं खपत ? "

" व्हय पर – मानसं सांगार्वी रोजानं ? "

धोंडी पुनः हांसला. तो म्हणाला,

" गड्या र ! गाय आटली आतां. व्हतं दुद तंवर तिनं काई कमी क्येलं न्हाई. आला त्यो परसन्न होऊन ग्येला. पर आतां काई कासंत दुदाचा योक थ्येंब न्हायला न्हाई—"

" आचीर हाय ! दादा, तुमचं समदंच आचीर ! "

न्याहारी करायला बसला, तेव्हां धोंडी गमतीनं सरूला म्हणाला,

" मालकीनबाई ! रोज येत जा वरं का श्येतांत ! मी काम करीतो का न्हाई करीत—"

सरूला थट्टा कळली, तरी तो बाण तिच्या जिव्हारीं लागला. काकुळतीनं ती पुटपुटली,

" दादा—"

" न्हाई माजी बाय ! उगीच गंमत क्येली ! "

शेतांत येतांनाचा सरूचा उत्साह कांहीं परततांना राहिला नाहीं. कशीं तरी पावलं उचलीत रेंगाळत ती घरीं निघाली. वाटेंत तिला बैल शेतांत घेऊन जात असलेला भुजाबा दिसला. तिच्या मनांत दुःख ठसठसत होतं. भुजाबा दिसतांच त्याला तोंड पडलं.

" मामंजी ! "

" काय बाई ! "

दादांनीं काय सुरू केलंय्—"

" काय ? "

" सगळं शेत ते खणून काढताहेत ! बैल नाहींत ना—! "

भुजाबा थक्क होऊन ऐकत राहिला. मग तो म्हणाला,

" धन्ये हाय हवालदार ! त्याच्यावानी रिशीचा मानूस म्यां पघितला न्हाई अजून ! "

" पण—त्यांना सोसायचं नाहीं हो हें ! शरीर कसं झालंय्—"

" व्हय बाई. खरं हाय तुजं म्हननं. पर त्यो आइकायचा न्हाई. मला भ्ये वाटतंय् इचरायचं."

" काय ? "

" मंडळी म्हनत हुती इर्जिकीचं. गांवावर लई उपकार हायेत हवालदाराचे. तर त्यांतून उतराई व्हावं, असा इच्यार होता समद्यांचा. बाई, असं कां करीत न्हाईस ? "

" कसं ? "

" तुज्यावर लई भाव हाय हवालदाराचा. तूं का इच्यारीत न्हाईस ? "

क्षणभर विचार करून सरू म्हणाली,

" बघेन विचारून. "

संध्याकाळीं धोंडी परतला तेव्हां त्याचं अंग नुसतं ठणठणत होतं. किती तरी दिवसांनीं त्यानं एवढे उरीं फुटेतोंवर श्रम केले होते. पण तो बोलला नाहीं. त्याला भय वाटलं, जर सरूला हें कळलं तर ती उद्यां शेतांत जाऊं देणार नाहीं. म्हणून तो तसाच मोठ्या उत्साहानं स्वयंपाकघरांत शिरला.

" बाय ! झालं का जेवाया ? "

" हो दादा. पाटावर बसा. पाणी ठेवलंय् गरम व्हायला. हातपाय धुवा अन् मग वाढत्यें."

" गरम पाणी कशाला ? "

" हवंय्."

" आर पर—"

" नाहीं दादा. मी ऐकायची नाहीं."

" कोंडीबा जेवला का ? "

" ते जेवून बाहेर गेलेत."

सरूनं कडकडीत पाणी अन् तेलाची तांबुली न्हाणींत नेऊन ठेवली. तें बघून धोंडी म्हणाला,

" इत्ती ही दिवाळी कशापाई ? "

" दिवाळी नाहीं, हातापायांना थोडं तेल चोळून गरम पाण्यानं शेका."

" न्हाई पोरी – नग मला त्येल. अग, आमचं म्हेनतीचं शरीर —"

" दादा, नाहीं तर मी येईल हां तेल लावायला ! "

" आर आर ! इत्का राग ! बरं लावतों."

धोंडीनं हातांपायांना तेल लावून गरम पाण्यानं ते शेकले, आणि मग जेवायला बसला.

"का क्येला ब्येत आज!"

"बाजरीच्या घुगऱ्या, दूध अन् गूळ."

"आर तिच्या मारी! लई थाट!"

सरूनं थाळी धोंडीसमोर ठेवली, अन् ती त्याच्या समोर बसत म्हणाली,

"दादा, सगळं संपवायचं बरं का! कसंहि झालं असलं तरी."

धोंडीला घुगऱ्या आवडत. एक ओरपा मारून तो म्हणाला,

"लई झकास ब्येत हाय."

अर्धे जेवण झालं. मग त्याला पुनः घुगऱ्या वाढून सरू बोलली,

"दादा!"

"का झालं बाई?"

"मीं एक बेत योजलाय्."

"कसला?"

"सागूं? तुम्ही रागवाल—"

"तुज्यावर न्हाई रागवायचा."

"मी शेतांत इर्जीक घालायची म्हणत्यें."

धोंडी क्षणभर सरूकडे पहात राहिला. स्थिर, निश्चल मुद्रेनं अन् मग म्हणाला,

"न्हाई."

"कां नाहीं दादा?"

"न्हाई पोरी. मनांतून काढून टाक त्यो इच्यार."

"पण कां तें सांगा ना!"

धोंडीनं पुनः तिच्याकडे पाहिलं. मग तो हंसला. प्रसन्न हंसू – सुप्त ज्वालामुखीच्या तोंडावरच्या झाडाझुडपांत वसंत बहरावा तसं. त्या हंसण्यामागं केवढी थोरली आग दडली आहे त्याची सरूलाहि नेमकी कल्पना आली नाहीं.

त्यावर पुनः कांहीं बोलावं असं कांहीं सरूला वाटलं नाहीं. ती तशीच बसून राहिली. धोंडी जेवण उरकून उठला, अन् चिलमीचा बार भरून झोंपीं गेला.

रात्रीं कोंडी घरीं आला. तो अंथरुणावर पडला, अन् सरूला म्हणाला,

"का बोलला दादा ?"

सरू धोतराला धांवदोरा घालीत बसली होती. दातांनीं दोरा तोडून सुई रिळाला टोचीत ती म्हणाली,

"नाहीं म्हणाले."

"म्यां तुमाला सांगटलं व्हतं."

"पण मीं ठरवलं आहे."

"का ?"

"आज संध्याकाळीं केरबा अन् भुजाबा आले होते कचेरींत. आणखी होते दोघे-चौघे. मीं त्यांना विचारलं. ते म्हणाले, नुसती तुम्ही दादाची परवानगीच काढा."

"मंग ?"

"आपापलीं कामं पाहून एका दिवसांत नांगरून टाकतो दहा एकर."

"पर दादा—"

"मी समजावीन त्यांना."

"आनी ?"

"उद्यां सगळ्यांना सांगायचं. परवां इर्जीक."

"पघा बरं ! दादा डोक्शांत राख घालील."

"नाहीं घालायचे."

"तुमाला ठावा न्हाई त्यांचा सोबाव—"

"नसूं द्या. त्यांचे हे कष्ट मला उघड्या डोळ्यांनीं नाहीं पाहवत. दिवसभर ढोरासारखी मेहनत करीत होते. त्यांचं शरीर बघितलंत का ?"

"पघितलं."

"मग ?"

" त्याचं असं हाय, त्यो काई आपल्या सांगीतला मानूस न्हाई. एखांद्या जागीं डोकं धिलंन् त्यानं म्हंजी मग हिकडला परपंच तिकडं झाला तरी स्यो डोकं काढायचा न्हाई."

" पण मी त्यांचं मन वळवीन ! तुम्ही तेवढं सांगून जा उद्यां."

" बरं ! "

*　　　*　　　*

दुसऱ्या दिवशीं धोंडी शेतांत गेला. त्यानं काम सुरू केलं. किसना कांहीं उगवला नाहीं. सरू न्याहारी घेऊन आली, तेव्हां तो तिला म्हणाला,

" किसनद्येव आज उगवलं न्हाईत ! "

" थकला असेल तो."

" थकाया का झालं ? का वान्याबामनाचा पोर हाय काय ? धाडून द्या त्याला."

शेवटीं दुपारच्या भाकरी घेऊन किसना आला.

" का व रावसाब ? "

" लई आंग दुकलं रातीं ! "

" हात् मर्दा ! एका रोजाच्या कामानं ? अर, ब्येलदार बारामास तेरा काळ कुंदा खनित्यात की रं ! "

" त्यांना सवईच हुत्यात कष्ट ! "

जेवून मग दोघे कामाला भिडले. किसना म्हणाला,

" दादा ! "

" का रं ? "

" उंद्या काई काम करावं लागाचं न्हाई."

" का ? "

" उंद्या स्येतांत इर्जीक येनार हाय."

" काय ? "

" इर्जीक."

धोंडी कुदळ थांबवून उभा राहिला. तो क्षुब्ध होऊन किसनाकडे पहात बोलला,

" कुनीं सांगितलं तुला ? "

" धाकले हवालदार सकाळीं सांगत हिंडत हुत—"

" त्वां सवता आइकलंस का ? "

" व्हय्."

" का म्हंगाला ? "

" म्हंगालं, का उंद्या आमच्या शेतांत इर्जिकीला यायचं ! "

धोंडीनं खालचा ओंठ चावला. त्याची नजर तांबारली. कांहीं क्षण तो दगडी पुतळ्यासारखा उभा राहिला. अन् मग तो कामाला भिडला. दिवसभर एका पळाची उसंत न घेतां तो राक्षसासारखं काम करीत राहिला. शरीराशीं झुंजत. तें नको म्हणत असतांहि.

तें थकलं होतं. त्याच्या ताठरपणाबरोबर धांवायला नकार देत होतं. काकुळत करीत होतं. विनंती करीत होतं. थांबू म्हणत होतं. विसांवा ध्यायला धडपडत होतं. शिणून चिपाड होऊं लागलं होतं.

पण धोंडी सगळ्यांवरच संतापला. घराण्याच्या थोरपणाचा तो अपमान त्याला सहन झाला नाहीं. त्या म्हाताऱ्या थोरपणासाठीं तो संतापला. कोंडीबावर. सरूवर. सगळ्यांवर. दिवसभर तो भसाभसा काम उपशीत राहिला.

अन् संध्याकाळीं बऱ्याच वेळानं तो घरीं परतला. वहाणा काढून तो बैठकींतच उकिडवा बसून राहिला. बाहेर कचेरींत मंडळी जमली. चिलिमा पेटल्या. अन् थोड्या वेळानं ती पांगली. तरी तो हालला नाहीं.

सरू बैठकींत दिवली लावण्यासाठीं आली, तिनं त्याला पाहिलं, अन् म्हणाली,

" दादा ! केव्हां आलांत ? "

तो एक शब्द बोलला नाहीं ! असं हें पहिल्यानंच घडत होतं ! कांहीं क्षण थांबून सरू आंत गेली, आणि गरम पाण्याचं तपेलं घेऊन ती बाहेर आली. तेलाचा तांबुली ओट्यावर ठेवीत ती म्हणाली,

" दादा, आज इथंच पाय धुतले तरी चालतील."

तरी उत्तर नाहीं !

हें बोलणं ऐकून कोंडी आंत आला, अन् त्यानं विचारलं,

" कवा आला दादा ? आमाला ठावंच न्हाई—"

अन् ज्वालामुखीचा स्फोट झाला !

" चंडाळा ! त्वा इर्जीक सांगितलीस ? "

" व्हय्—"

" अर त्यापरीस माज्या डोक्शांत कुराड कां घातली न्हाईस ? आं ? "

" न्हव दादा—"

" अर कुलक्षना, लाज न्हाई वाटली ? कुनाच्या श्येतांत इर्जीक सांगितलीस ? शिवाजी राजाच्या हवालदाराच्या ? तुंगीगडाचा हवालदार—समदा पवनपट्टा ज्याला अजून [illegible]—[illegible] श्येतांत ? इर्जीक कुटं घालीत्यात ? ज्याच हातपाय थकलं, त्याच्या श्येतांत. ज्याला आतां काम हुईना झालं, त्याच्या श्येतांत. ज्याचं बळ कमी पडलं, त्याच्या श्येतांत. ज्याचा वाली कुनी उरला न्हाई, त्याच्या श्येतांत. आन् आतां अगदीं जमिनीचा ताव वायां चालला,—तवा घालीत्यात इर्जीक—"

" ऐकून तर घ्ये दादा—"

" काय घ्येऊं ऐकून ? माज हातपाय थकलं ? मला काम हुईना झालं ? माजं बळ कमी पडलं ? माजा वाली उरला न्हाई ? जमिनीचा ताव वाया चालला ? "

" पर समदा गाव म्हंगाला—"

" अर मस म्हंगाला समदा गाव ! उंद्या गाव म्हनल, आमच्या घरून वाढनं घ्येऊन जा सनासुदीचीं,—याल का घ्येऊन ? आर तुमी कोन ? आपल्या वाडवडलांची काय कीरत ? काय त्यांचं धाडस ? काय त्यांचा बाना ? आर मर्दा, सबुदासाठीं ज्यानं असुदाच ऽ पाट वाहावल श्येतात, त्याच्या कुळाचा दिवा तूं !—असा कसा र पाक ढिला निपजलास ? आर, काइच कसं तुज्या जिवाला वाटलं न्हाई ? आर मी जिता हाय ना अजून ! बैलावानी खपतोय्

ना अजून श्येतांत ? आर आर आर ! थू तुज्या जिन्यावर ! आर आर आर—"

धोंडीच्या डोळ्यांतून ऊन्ह ऊन्ह आंसवं टपाटपा गळूं लागलीं !

त्यानंतर त्यानं तोंडाला कुलूप घातलं. शेवटीं सरूनं हजार विनवण्या केल्या, तेव्हां तो चार घांस जेवला, अन् मुकाट्यानं झोपून राहिला.

*            *            *

पहाटे दुधं काढून कोंडी लोणावळ्याला गेला. एकदां सरूनं बैठकींत डोकावून पाहिलं. तिला धोंडी दिसला नाहीं. कोंडी गेल्यावर ती शेणपाणी करायला गोठ्यांत आली. तेव्हां तिला उमगलं, कीं म्हातारा गर्जन बैल कुठं दिसत नाहीं.

तिचं लक्ष औतं ठेवीत त्या झापाकडे गेलं. तिला नांगरहि दिसेना. तिनं तपास करून पाहिलं. तिला आढळलं, कीं शिवळा, चऱ्हाट, शिळवाटी— हें सगळं इथून हाललं आहे !

तेव्हां मग तिनं घाईघाईनं दारं लावलीं. पुढल्या दाराला कडी घातली. धांवत ती शेताकडे निघाली. मनांत हजार विचार. दुसरा बैल कुठून आणला कोण जाणे !

आणि ती शेताच्या मेरेवर जाऊन पोंचली, तेव्हां तिला जें दृश्य दिसलं तें कल्पनातीत होतं ! मोहिनीनं भारल्यासारखी एका जागीं खिळून ती तें पहात उभी राहिली. तिची वाचाशक्तीहि जणूं कुंठित होऊन गेली. तिच्या तोंडांतून शब्द कांहीं उमटेना.

मावळूं घातलेलं हवालदार घराण्याचं सत्त्व तिच्यासमोर प्रकट झालं होतं. त्या पुरातन, प्राचीन ताठ्यानं, पिळानं आपलं अंग न् अंग जणूं आकाराला आणण्याचं ठरवलं होतं. तो अस्तंगत होऊं पाहणारा दिमाख, तें तेज जणूं तिला असं बजावीत होतं, कीं माझी ज्योत कायम आहे, राहील—शेवटल्या क्षणापर्यंत—

हें शिवप्रभूच्या काजासाठीं शर्थीनं झुंजलेल्या हवालदाराच्या वंशजाचं

रक्त आहे. त्याला परिस्थितीपुढं वाकणं माहीत नाहीं, मान झुकवणं ठाऊक नाहीं ! तें एकच्च गोष्ट जाणतं —झुंजणं – टक्कर घेणं – धडका देणं !

या काळीमायवर या माणसाचं अपार प्रेम आहे. श्रद्धा आहे. भक्ति आहे. बोलकी नाहीं; जित्राभात्राची. काळीमायसाठीं रक्त सांडावं, अशी मनोमन इच्छा होती. ती पुरी व्हावी, म्हणून हा माणूस उफाळलेल्या आगींतसुद्धां हसतां हसतां उडी घेईल—

सरूला हात जोडावेसे वाटले. पण तेंहि तिला शक्य झालं नाहीं. ती उभी होती तशीच बाभळीला हात देऊन तें दृश्य पहात राहिली—हारपून.

शिळवाटींत डोकं अडकवून एका बाजूला चालला होता म्हातारा बैल गर्जन,–अन् दुसऱ्या बाजूला तुंगीगडाचा हवालदार धोंडीबा ढमाले,— ज्याच्या शब्दाला हिऱ्यामोत्याचं मोल होतं–अजूनहि !

रुमण्याला कासरा बांधून त्याचं टोंक गुंतवलं होतं गर्जनच्या मानेजवळ, अन् दुसरं धोंडीनं आपल्या कमरेला बांधलं होतंन् ! कसा तरी भेलकांडत उखरवाखर करीत नांगर त्या जोडीमागं धांवत होता.

प्रत्येक पाऊल टाकतांना धोंडीला जिवाची शर्थ करावी लागत होती. रक्त सगळं तोंडांत उतरलं होतं. डोळे विटकरीसारखे तांबडेलाल झाले होते. चेहऱ्याची नस न् नस फुलून गेली होती. मानेच्या शिरा ताठरल्या होत्या. सगळ्या अंगावरून टपटपा घामाचे थेंब खालीं धांवत होते. त्यांत प्रतिक्षणीं झोकांड्या खाणाऱ्या नांगराचे झटके !

पण त्याच्या चालींत खंड पडत नव्हता,–तो तार स्वरांत बडबडत होता,

" चला बापा – गर्जेनराजा ! चला ! ही शेवटच्चीच चाल हाय ! तुजी अन् माजी. इत्ती वरसं या काळीमायनं आपल्याला पोसलं. तिच्या जिवावर इत्तीं वरसं हवालदार म्हनून मिरवलों. मान घ्येतला, मुजरे घ्येतले – आतां ती कष्ट मागती !

" आज तिच्यांत इर्जीक येनार !

" कवा आली न्हाई र आजपत्तुर ! पर आज येनार !

" तवा आपल्याला आपलं काम क्येलं पायजे ! न्हाई तर गांवकरी

म्हंतील, आमाला जुपलं कामाला,–हवालदार अन् त्याचा म्हातारा गर्जेन बैल – दोघंबी न्हायले मक्याचीं कनसं खात—

“ न्हाई ! गर्जेन राजा, गांवकऱ्यांचं त्ये बोलनं मपल्या जिवाला लई लागल् ! तवा चला !

“ आपल्या राज्यांत आपुन ह्ये असलं होऊं दिलं न्हाई र ! पर आतां राज बदललं. धनी बदलला. म्यां इर्जीक येऊं धिली न्हाई श्येतांत. त्यानं सुपारी देऊन आवतन धिलं गायाला—

“ तर आपुन कमी पडतां उपेगाचं न्हाई ! धन्याला दावलं पायजे – आमालाबी कष्ट करतां येत्यात. आमालाबी काळीमाय निढळाच्या घामानं भिजवितां येती – आमालाबी—”

बैल क्षणभर थांबला. शिळवाटी करकरली – एकट्या धोंडीच्या दाबानं. त्यानं तें पाहिलं. शिळवाटींतून मान काढून कसातरी धांवत तो बैलाकडे गेला. त्याच्या पाठीवर थाप टाकून त्यानं त्याचा मुका घेतला, आणि त्याच्या गळ्यांत गळा घालून म्हणाला,

“ माज्या वासरा ! अर लई दिस या श्येतांतलं बाटुक खाल्लं हायेस ! या श्येतांतलं शिप्पीचं गवत—या श्येतांतल्या बाजरीचा खिचडा म्यां मपल्या हातानं चारलाय् तुला ! उभा न्हाऊं नगस – माज्या सोन्या ! लेकरा,—आर आज ह्ये शेवटच्चंच—पुन्ना न्हाई ! कंदीबी न्हाई—हूं !”

गर्जेनला जणूं तें उमगलं. तें मुकं जनावर—पण त्यालाहि आपल्या मायाळू धन्याची भाषा कळली. त्याच्या थकलेल्या डोळ्यांतून पाणी गळूं लागलं. अवसान सांवरून त्यानं शिळवाटीवर आपल्या मानेचा भार घातला.

पुनः धोंडीनं शिळवाटींत मान गुंतवली, आणि म्हणाला,

“ हूं ! भले राजा, भले ! गानं म्हनीतों तुला—

**गर्जेन माजा राजा—**<br>
**हवालदाराचा बईल—**<br>
**काळ्या आईसाठीं**<br>
**त्याचं सोनं र व्हईल—**

नांगर पुढं सरला. ढेकळांच्या अंगानं धोंडीला चालावं लागत होतं—धडपडत – ठेचा खात. गुडघ्यापर्यंत पाय रक्ताळले होते. पण तो प्राण पणाला मांडून नांगर ओढीत होता.

अचानक त्याची नजर सरूकडे गेली. तो ओरडला,

" आज्ये ! बग तुजा नातू ! काई कमी क्येलं न्हाई ना ! इरस राकली ना ? चला - गर्जेन राजा ! मालकीनबाई पघत्यात. चला ! त्यांचं आन्न ातों—जागा अन्नाला ! चला,—आज इर्जीक येनार हाय्;—आपुन ग न्हातां उपेगाचं न्हाई,—चला – चला माज्या वांसरानो,—चला ! ले ! चला ! "

अचानक धोंडी थांबला. जणूं त्याचं सबंध शरीर घुसळून निघालं. तो कसाबसा ओरडला,

" सरूताय् ! माय माजी ! "

—अन् त्याला भडाभडा रक्ताची ओकारी झाली ! शिळवाटींत डोकं अडकलेल्या स्थितींतच तो खालीं कोसळला.

विजेसारखी सरू जाग्यावरून हालली. कांहीं क्षणांत ती त्याच्याजवळ पोंचली. मोठ्या श्रमांनीं तिनं त्याचं डोकं शिळवाटींतून बाहेर काढलं, आणि तें मांडीवर घेतलं. तोंडावरचं रक्त पुशीत ती कांपत्या आवाजांत थरथरत म्हणाली,

" दादा ! – माझे दादा ! —"

धोंडीनं डोळे उघडले. सरूच्या तोंडाकडे पहात तो पुनः एकदां तें प्रसन्न हंसूं हंसला. म्हणाला,

" सरूमाय ! रडती ?—छाः – रडत नसत्यात ! आज इर्जीक येनार—माज्या वाट्याचं काम – म्यां करून टाकलं;—रगात व्हायलं जनूं ! सरूमाय, बरं झालं. माजी लई दिसापून विच्छा होती—"

—पुनः तो हंसला ! सरूनं थरथरत्या हातांनीं मोठ्या मायेनं आपल्या पदरानं त्याचं तोंड पुसून काढलं ! !

• • •

**चिं. वि. जोशी**

संशयाचें जाळें — २।।

आमचापण गांव — ४

**ग. त्र्यं. माडखोलकर**

भंगलेलें देऊळ — ३

मुक्तात्मा ( संक्षिप्त ) — १।।

अरुंधती

**श्री. कृ. कोल्हटकर**

श्यामसुंदर ( संक्षिप्त ) — १।।

**ना. सी. फडके**

प्रवासी ( दु. आ. ) — ६

अंजली — ६

पतंग — ५

शिकार — ५

इषारा — ३।।

प्रवासी ( संक्षिप्त ) — १।

अल्ला हो अकबर ( संक्षिप्त ) — १।।

**ना. धों. ताम्हनकर**

मामा — २।।

सावटांतलं रोप — २

**साने गुरुजी**

रामाचा शेला ( दु. आ. ) — ४

**बा. भ. बोरकर**

भावीण — ४

**ह. भा. वाघोलीकर**

गुप्त खजिना — २

**मनमोहन**

लुटुजी खटुजी — १।

**सौ. मालतीबाई दांडेकर**

हिरा आणि गारगोटी — १।।

**द. र. कवठेकर**

शालन — ३

मंदा — ३

**रामतनय**

प्रमिलाबेन — .

**रमाकांत वेलदे**

भूक ( दु. आ. ) — ४

**नाथमाधव**

स्वराज्याचा श्रीगणेशा ( संक्षिप्त ) — १।।

,, ची घटना ( ,, ) — १।।

,, ची स्थापना ( ,, ) — १।।

स्वराज्यावरील संकट ( ,, ) — १।।

**य. गो. जोशी**

पडसाद ( संक्षिप्त ) — १।।

साहित्यिकांची सफर — १।।

**मामा वरेरकर**

धांवता धोटा ( संक्षिप्त ) — १।।

**खलिल जिब्रान**

तुटलेले पंख — ३

● ● ●